होतें. मस्तानीचा महाल तयार करविला आणि जागजागा चौक, सदरा, जामदारखाने व शिलेखाने व तोफखाने, कोठी तयार करविली. मस्तानी कळवांतीण छत्रसाल राजानें दिली ती बाजीराव साहेबांनीं राखिली होती. बाजीराव साहेब फौज तयार करून हिंदुस्थानांत गेले.

इकडे संभाजी आंग्रे फिरून कुलाब्यास आले. ते समयीं मानाजी आंग्रे यांचे पुत्र येतांच आपासाहेब दर मजल कूच करून कुलाब्यास गेले. तुळाजी आंग्रे संभाजी आंग्रे यांजबराबर होते. युद्धप्रसंग होते समयीं तुळाजी आंग्रे यांस धरून नेलें. मानाजी आंग्रे बनायतमहा यांपासून पाली व मिरगड सरकारांत घेतला. आपासाहेब पुण्यास आले. बाजीराव साहेब श्रीओंकारमानधाता प्रांतास आले. चार दिवस मुक्काम होता. एके दिवशीं शरीरीं ज्वर येऊन सातवे दिवशीं मृत्यु पावले. क्रियाकर्मांतर तापीतीरीं केलें. कारभारी फौज घेऊन देशीं आले. आपासाहेब यांस हें वर्तमान समजतांच पुण्यास आले. शके १६६२ रुद्रनाम संवत्सरे या सालीं परलोकास गेले. काशीबाईस व सातारेकर राजे यांस बहुत दुःख झालें. त्यांस पुत्र येणेंप्रमाणें:—

१ बाळाजीपंत ऊर्फ नानासाहेब; २ जनार्दनपंत ऊर्फ अण्णा; ३ रघोबा ऊर्फ दादासाहेब; येणेंप्रमाणें खाशी मंडळी तीन व चवथा मस्तानीचा समशेर बहादर. येणेंप्रमाणें होते. आपासाहेब पुण्यांतच होते. नानासाहेब सातार्‍यास शाहूमहाराजांचे दर्शनास गेले. महाराज शाहू [यांनीं] कृपावंत होऊन वस्त्रें प्रधानपंत यांचीं दिलीं. नंतर पुण्यास आले.

आबाजीपंत बापू पुरंदरे यांचे पुत्र महादेव बाबा पुरंदरे यांस नानासाहेब यांजबराबर देऊन हिंदुस्थानांत रवाना केलें. पिलाजी जाधव व मल्हारराव होळकर व राणोजी शिंदे व येशवंतराव पवार [असे] कितीएक सरदार समागमें होते. हिंदुस्थानास जाऊन शत्रूचा पराभव करून त्या वर्षीं छावणी करून दुसरे वर्षीं बागलाणांत स्वारी केली. त्या प्रांतीं रघोजी भोंसले सेनासाहेब सुभा होते. त्यांची व श्रीमंतांची गांठ पडून युद्धप्रसंग होऊन भोंसले यांस लुटिलें. बागलाणची खंडणी दरसाल करार करून माघारें फिरले. आपासाहेब पुण्यास होते. त्यांस व्यथा होऊन शके १६६५ चें सालीं कैलासवासी झाले. त्यांस पुत्र एकः—

१ सदोबा ऊर्फ * भाऊसाहेब.

---

१९. ही बाजीरावाची पत्नी.
२०. इ. स. १७४१.
२१. ग्रांटडफ साहेब हे चिमणाजी आपा इ. स. १७२१ त म्ह. शके १६६३ त वारले असें म्हणतात.
* यांचें जन्म इ. स. १७३१ त झालें होतें.

नाना साहेब स्वारी करून पुण्यास आले. राजदर्शनास गेले. रघोजी भोंसले ही आले. आठ महिने बखेडा पडला. तेव्हां नाना साहेबांची व भोंसल्यांची समजूत महाराजांनीं करून दिली. तेथून निघून पुण्यास आले. जनार्दनपंत हे मृत्यु पावले. सदोबा भाऊ, राघोबा दादा, व समशेरबहादर पुण्यांत वाड्याचें काम चालत होतें तेथें रहात होते. बाळाजीपंत नाना साताऱ्यास जाऊन दरबार करीत होते. परशरामपंत प्रतिनिधि पूर्वी होते ते वारल्यावरै[२२] श्रीपतराव प्रतिनिधि करूं लागले. कारभार चालला. परंतु बाजीराव साहेब होते तेव्हां चढती दौलत होती. हल्लीं द्रव्य कोणीकडून येईनासें झालें. खर्चाची तंगचाई पडली. सबब दाभाडे यांस हुजूर बोलावण्याकरितां पत्रें पाठविलीं. परंतु दारू पिवून मस्त तो येईना. तळेगांवास स्वस्थ बसले. महाराजांनीं प्रधानास बोलावून सांगितलें कीं खर्चाची तंगचाई पडली. प्रांतांत फौज पाठवून चवथाईचा पैका आणवावा तर फौज घेऊन दाभाडे तळेगांवीं स्वस्थ बसले. त्यांस धरून आणवून फौज पाठवून प्रांतांतील जमा आणवा. त्याजवरून अष्ट प्रधानांनीं विचार केला कीं, फौज पाठवून धरून आणावें तरी फौज त्याचे स्वाधीन. तेव्हां सावकाराकडून कर्ज काढून फौज ठेवून धरून आणावा. ही मसलत अवघड आहे अशी अष्ट प्रधानांनीं विनंति केली. त्याजवरून राजास वाईट वाटून महालांत जाऊन बाजीराव यांचा कारभार आठवून त्यांचे पुत्र बाळाजीपंत नानासाहेब यांस बोलावूं पाठविलें. तेव्हां नानांची उमर २५ वर्षांची होती व सदोबा भाऊंची उमर २० वर्षांची होती. राजा जवळ गेले. राजांनीं सांगितलें कीं, दाभाडे धरून आणिले पाहिजेत. याची तजवीज काय ? त्यांनीं उत्तर केलें कीं, साहेबांचे हस्त मस्तकीं असल्यास सर्व घडून येईल. राजा शाहू यांनीं हिंमतीचें उत्तर ऐकून संतोष होऊन बाळाजी पंताचे मस्तकीं हात ठेविला. उद्यांना दाभाडे धरून आणितों म्हणून नाना बोलले. महाराजांनीं विजयी होणें म्हणून विडे नानांस देऊन वाटे लाविलें. भाऊ व नाना तेथून निघून रानदरबारास आले. मानकरी सरदार हुजूर रहात होते त्यांस सर्वत्रांस राजाज्ञा जाहीर केली कीं, दाभाडे धरून आणिले पाहिजे. मानकरी यांनीं उत्तर केलें कीं, आम्हीं जातीनें शेंपन्नास आहोंत. आमचे स्वार दाभाडे यांजपाशीं चाकरीस आहेत. असें मानकरी यांनीं सांगितलें. नंतर बाळाजीपंत नानांनीं सांगितलें कीं तुमचे लोक तेथें आहेत त्यांत तुमचे भाऊबंद इष्टमित्र सोयरे धायरे आहेत. त्या सर्वत्रांस सांगून पाठवावें

---

२२. शके १६६८ म्ह. इ. स. १७४६त | २१. इ. स. १७२० त.

कीं, आम्ही लटाईस आलों असतां तुम्ही हत्यार धरूं नये. असें सांगून फिनूर करविला. आणि बाळाजीपंत नाना यांनीं मानकरी यांस विचारलें कीं, हिंदुस्थानास रावसाहेब गेले होते त्याजबरोबर हुजरात खेरीज करून इतला-ख लोक होते ते दूर केले. त्यांची नांवनिशी कोण कोठें कोणत्या गांवास आहेत तें सांगावे. त्याजवरून माहितगारी विचारून घेऊन पांचशें जासूद तयार करून राजाज्ञेचीं पत्रे येण्याविषयीं पाठविलीं. शिपाई धनगर मल्हारराव होळकर चाळीस हजार फौज घेऊन राजआज्ञेप्रमाणें दाखल झाले. मानकरी यांनीं दाभाड्यांकडील वीस हजार फौज फोडली. एकूण साठ हजार फौजेचा मेळ झाला. नानांनीं राजास विनंति केली कीं, फौज तयार आहे. राजांनीं आज्ञा केली कीं दाभाडे यांस धरून आणावें.

आज्ञा घेऊन होळकराकडे आले. राजाज्ञेचें पत्र देऊन रामाज्ञा सांगितली. होळकरानीं मान्य केली. नाना व मानकरी वाणीउदमी व कारकून व चाकरमाने उमेदवार होते ते सर्व पांच हजार जमा करून होळकर व मानकरी सुद्धां सातान्याहून कूच करून फौजेनिशीं तळेगांवावर आले. हें वर्तमान दाभाडे यांस कळलें. फौज सिद्ध करून गांवाबाहेर फौजेचा फरा धरून उभे राहले व हेही सन्मुख फरा धरून उभे. कोणी कोणावर हत्यार टाकिलें नाहीं. तिसरा प्रहर झाला. दाभाडे अंबारींत होते. घोड्यास वगैरे पाणी पाजावयाकरितां दाभाडे तळ्याकडे गेले. यांनीं "हरहर महादेव" म्हणून उठावणी केली. तों दाभाड्याचे लष्करांतील वीस हजार फौज यांचे लोकांत मिळाली. दाभाडा ही सांपडला. त्यास धरून मारून लुटालुटी करून धरून सातान्यास आणिलें.

महाराजाकडे बाळाजीपंत नाना गेल्यावर शाहू महाराज [यांनीं] फार कृपावंत होऊन प्रसन्न होऊन नानांस शिक्केकटार दिली. शिक्क्यांतील नांव येणें-प्रमाणें:--"राजा शाहू छत्रपती हर्षनिधान, बाळाजी बाजीराव मुख्यप्रधान" असा शिक्का हवाली केला. सर्वांत पेशवे हा किताब दिला. वस्त्रें अलंकार देऊन विडे दिले पुढें कामकाज राज्यकारभार नानांचे विचारें होऊन राज्याचा व खासगी खर्चाचा व फौजेचा बोभाट [ त्यांनीं ] पडूं दिला नाहीं.

पूर्वी बाजीराव यांनीं जागोजाग सरदार पाठविले होते. ते कांहीं मरून गेले. अमलांत मोंगल मवासी बदलून होते. तेव्हां बाळाजीपंत नानांनीं यशवंतराव घोरपडे यास बोलावून सांगितलें कीं, पूर्ववत् प्रमाणें फौज धरून कर्नाटक प्रांती विजापूर सुभा घेऊन कडपे, कर्नोळें, शिरशाहापूर, बागलकोट एथील पठाण

बदललेले आहेत त्यांची खंडणी जेर करून घेऊन श्रीरंगपट्टण, चित्रदुर्ग, वगैरे येथील खंडण्या घेऊन त्या प्रांतीं असावें. पैका सातान्यास पाठवावा. तुमचे मदतीस गोपाळराव हरी यांस पाऊण कोटीचा मुलूख सरंजामास देऊन सिरजेस पाठविले आहे. काम पडल्यास तुम्हांस मदतीस येतील. असें सांगून घोरपडे यांस कर्नाटकांत रवाना केलें. राणोजी कवडे मेले. त्यांचा पुत्र आवजी कवडे यांस भागानगर प्रांतीं पूर्ववत् प्रमाणें फौज सुद्धां पाठविलें. पेशजीं राजाचे हातच्या सनदा तुम्हांजवळ आहेत त्याप्रमाणें बालेघाट वगैरे चौथाई पुंड पाळेगार सर करून पैका घेणें. जानोजी[२४] भोंसले यांनीं कर्नाटकांत राज्य काबीज करून जातीनें लढाई करून राज्य आक्रमिलें. पुढें अक्कलकोटास जाऊन राहिले. कान्होजी भोंसले चाळीस हजार फौज घेऊन वऱ्हाड प्रांतीं अलिचपूर गोंडवण येथील अंमल करून नागपुरास राहिले. जवळ मुलूख दीड दोन कोटींचा झाला. संभाजी राजे कोल्हापूरचें राज्य वीस लक्षांचे सुमारें घेऊन करवीरीं राहिले. प्रतिनिधि श्रीपतराव सरंजामाचा मुलूख घेऊन कऱ्हाडास राहिले. सचीवपंत भोरचें ठाणें बसवून भोरास राहिले. राघोबा दादा यांस हिंदुस्थानांत पाठविलें. पन्नास हजार फौज व तोफखाना, मल्हारराव होळकर व शिंदे[२८] यांजला बरोबर देऊन रवाना केलें. लाख फौज समागमें झाली. शिंदे पुढें पंचवीस हजारानिशीं अघाडीस, होळकर तीस हजारांनिशीं पिछाडीस, चालत. दरकूच शरयूतीरास गेले. तेथून साठ कोस दिल्ली होती. त्या प्रांतीं मुलाजफखां पठाण चाळीस हजार फौजेनिशीं होता. तो मल्हारराव होळकर यांजवर चढून आला. दादा साहेबांस समजलें. जयाजी शिंदे यांस कुमकेस पाठविलें. तों अगोदरच होळकरांनीं पठाणास मोडून फौज लुटून फस्त केली. पठाण पळाला. दोनशें अंबारी जनानखाना होता तो दादासाहेब यांजकडे पाठविला. त्याची जती करून कूच केला. नखकडी शहरास सुजातदौला मातबर होता. त्यास विषम वाटलें कीं, पठाणांच्या बायका दक्षणी घेऊन जातात. आपली मुसलमानांची अब्रू जाते. म्हणून त्या बायकांची खंडणी वीस लक्ष रुपये देऊन सोडविल्या. दादासाहेबांनीं रुपये घेऊन हत्तीसुद्धां बायका सोडून दिल्या. तेथून कूच करून दरोबस्त प्रांतांतील खंडण्या घेऊन परतले.

---

२४. हाच फत्तेसिंग भोंसला असावासें दिसतें.

२५. इ. स. १७१३ पासून संभाजी करवीरीं राहूं लागले. ते इ. स. १७६० त वारले.

२६. श्रीपतराव इ. स. १७२० पासून १७४७ पर्यंत.

२७. इ. स. १७.५ त.

२८. जयाप्पा.

नानासाहेबांनीं दाभाडा धरला तेव्हां तळेगांव दाभाड्याचें लुटलें. तेव्हां पर्वती देवी व महादेव [ हे दोन देव आणि ] दौलत सुमोरें पांच कोटींची सांपडली. तेव्हां नानासाहेबांनीं पर्वती आणून पुण्यानजीक डोंगरी आहे तेथें स्थापित करून सरंजाम चौघडा देऊन श्रावणमासाची दक्षणा चालू केली. रमणा बांधिला. व बागबगीचे पुण्यानजीक बांधिले. हिराबाग व सप्याचे बाग व लालबाग वगैरे बांधिले. बाहेरचे नहर पाण्याचे प्रयत्न करून हौद जागोजाग शहरांत बांधिले. दादा साहेब पुण्यास येऊन पर्वतीचे दर्शनास गेले. पैका जामदारखान्यांत ठेविला.

इकडील मोंगल निजाम उल्मुलुख हैदराबादेस राज्य करीत होते. ते हक्क* झाले. त्यांस पुत्र ६ येणेंप्रमाणें:—

१ गाजुदीखां दिल्लीस होते ते मारिले. वजिरी करीत होते.
१ नास जंग †पु[illegible]लचरीस मारिले.
१ सलाबतजंग ते ही मारले.
३

१ बसालतजंग.
१ निजामअल्ली.
१ मोगल अल्ली.
३

६

येणेंप्रमाणें सहा पुत्र. सलाबतजंग तिघे बंधु कैद करून आपण राज्यकारभार करूं लागले. नंतर निजामअल्ली फितूर करून गांवाबाहेर शहर सोडून विसा कोसांत जाऊन एका झाडा खालीं बसले. कहारहोदा घेऊन माघारे गेले. तों त्यांमागें अकस्मात विठ्ठल सुंदर रोजगारउदेशें येत होते ते सलाम करून झाडाखालीं उतरले. मर्जी दिक्क पाहून विचारिलें. तेव्हां निजामअल्ली यांनीं झालेलें वर्तमान सांगितलें. त्यावरून विठ्ठल सुंदर बोलले कीं, तुमचे मायेचे सरदार कोणी आहेत किंवा नाहींत. निजामअल्ली बोलले कीं, सध्यां तुम्हीं आमचे जवळ असावें. पुढें विचार जसा होईल तसा पाहूं. असें सांगून उभयतां आपले लष्करानिशीं एके ठिकाणी छावणी करून राहिले. सलाबतजंग व किलिचखां ही बराबर होते. रामदासपंत दिवाणगिरी करूं लागले. सलाबतजंगास अंबारींत बसवून खावंद केलें. सलाबतजंग करनाटकचे स्वारीहून भागानगरास आल्यावर रामदासपंत बिघाडाचा

२९. या साहां खेरीज फेरोजजंग व मीर शरीफ हे दोन आणखी पुत्र त्यांस होते.
३०. इ. स. १७४८ त निजाम उल्मुलुख वारल्यावर.

* हक्क जाले=मृत जाले.
† इला इंग्रजींत Pondicherry ह्मणतात.

ढोल धरून दरमजल आले. तेव्हां श्रीमंत नानासाहेब व दादासाहेब व भाऊ-
साहेब फौज जमा करून समीपतेस येऊन कुकडी नदीवर लढाई सुरू झाली.
नबाबाजवळ फौज भारी. तोफखाना व मुसा भुसी* फ्रांसीस असे जंगी सा-
मान असतां श्रीमंत मराठी काव्यानें चौफेर फौज करून लढाया करीत
होते. त्या समयांत त्रिंबक किल्ल्यांत त्रिंबक सूर्याजी यांनीं कोळी
लोक जमा करून किल्ल्याचा भेद केला. रात्रीस जाऊन किल्ला फत्ते केला.
हें वर्तमान रामदासपंतास कळतांच कोरेगांवाहून माघारे फिरून गेले. तह
पुरळीत न झाला.

श्रीमंत गंगातीरास गेले होते. तेथून पुण्यास यावें तों महाराजांनीं निम्मी
गुजराथ श्रीमंतांस दिली असतां अम्मल बसला नव्हता तो बसावयाकरितां श्रीमंत
यांनीं दादासाहेब यांजबराबर फौज देऊन गुजराथ प्रांतीं रवाना केलें आणि
नाना व भाऊ दर मजल पुण्यास आले. दमाजी गायकवाड फौजे
मुद्धां पूर्वी दुर्बुद्धीनें आले. त्यांची लढाई होऊन धरून बिडी घालू[illegible]
ठेविलें होतें. त्याजबराबर फौज देऊन गु[illegible] रवाना केलें. गुजराथचे म-
हाल निम्मे सरकारांत ठेवून निम्मे गायक[illegible] यांस देऊन दमाजी गायकवाड
यांची बिडी तोडून वस्त्रें देऊन सरकारचे [illegible]कर म्हणोन ठेविलें. आतां होळ-
कर यांची माळिका तरी [ ते ] प्रथम जे[illegible]जुरी गांव एथील पाटील [ होते. ]
रोजगारउद्देशें सातान्यास महाराजांजवळ [illegible]ाले. जातीचे धनगर. शिपाई तर-
वार बहादर म्हणून खानदेशांत रवाना झाले [illegible] बांडे पूर्वीचे राजाचे चाकर. त्यांज-
कडेस शिलेदारीचें काम घेऊन राहिले. दोन तीन पिढ्या त्यांची चाकरी
केली. मग मल्हारराव[१२] होळकर जाले. त्यांस दोन तीनशें घोड्यांची पागा सां-
गितली. त्यांनीं तळेगांवीं दाभाडे यांशीं लढाई करून शिकस्त करून [ दाभाडा ]
लुटून घेतला. तेव्हां पासून सरदार पेशवे य[illegible]चे झाले. मग इतमाम चांगला झाला.
हल्लीं तरी बांडे निशाण व बांडे फडके वगैरे चालूचाल होळकर यांचे ये-
थील बांडे खानदेशांतील यांचे घरचे आहेत. दादा साहेब माहाल घेऊन, मा-
हालीं कमावीसदार पाठवून, कूच करून, पुण्यास आले.

नबाब भागानगरास गेल्यावर माहे सफर स[illegible]न हिजरी सब्बा शीतेन मय्या व अल्लफ
[११६७] या सालीं रामदासपंत दिवाण मारले. नंतर शाहखां दिवाण झाले. ज-
वळ बसालतजंग भागानगरास होते. इकडे विठ्ठल सुंदर यांणीं वि-
चार करून निजामअल्ली यांस विचारिलें कीं, तुमचे मायेचे कोणी सरदार

* हा M. Bussy होय.

११. इ. स. १७५५ त.

१२. इ. स. १७२४ पासून.

आहेत कीं नाहींत. तेव्हां निजामअल्ली यांणीं सातजण पठाणांचीं नांवें लिहून दिलीं. सातजण पठाणांची पत्रें निजामअल्लीचीं घेऊन विठ्ठल सुंदर शहरांत हैदराबादेस आले. निजामअल्लीस एक गढींत बंदोबस्तानें ठेवून परस्परें क्रियाभाषणें होऊन हैदराबादेस आले. रात्रीं पठाणांची भेट घेऊन पत्रें दिलीं. त्यांणीं रुकार दिला. चौदा रोजांनीं हैदराबादेस तीस हजार फौज सिद्ध करून आम्ही येतों अशीं पत्रें पठाणांचीं घेऊन विठ्ठल सुंदर निजामअल्लीकडे आले. पठाणांचीं पत्रें दिलीं. दहा हजार फौज जमा करून हैदराबादेस गेले. पठाण फौजेसुद्धां येऊन भेटले. एकूण चाळीस हजार फौज जमा झाली. हें वर्तमान बसालतजंगास भागानगरास आलें. त्यावरून नवाब बसालतजंग फौजेची तरतूद करून स्वारीची तयारी करूं [लागले]. इतक्यांत निजामअल्ली फौजेसुद्धां भागानगरास येऊन दाखल झाले. महालांत जाऊन नवाब बसालतजंग यांस धरून भिंतींत चिणून टाकिलें. सलाबतजंग कैद केला होता तो कालें करून मृत्यु पावला. नंतर निजामअल्ली राज्यकारभार करूं लागले. आपला बंधु मोंगलअल्ली यास अदवानीरायचूरचें राज्य दिलें. राज्य करूं लागले. निजामअल्ली भागानगरास राहून राजसुख भोगून बेफिकीर होते.

दिल्लीहून पातशाहांनीं गाजुदीखां यांजवर मेहरबान होऊन दक्षिणच्या सुभ्याची सनद देऊन, खिलत, वस्त्रें, हत्तीघोडे, जवाहीर, शिक्केकटार, देऊन रवाना केलें. त्या वर्षी नानासाहेब व भाऊसाहेब व दादासाहेब पेशवे आषाढमासीं स्वारीस बाहेर पडून फौज मारीत चलले. नवाब निजामअल्ली हे हैदराबादेहून पुढें आले. त्यांची व ह्यांची गांठ भालकीचे मुक्कामीं पडून, लढाई सुरू होऊन, दीड प्रहरपर्यंत कत्तल होऊन, सफेजंग लढाई मातबर झाली. शिंदे व होळकर यांनीं पांच हजार घोडे पाराव करून घेतले. नवाब जेर झाले. सल्ला करून ३० लक्षांचा मुलूख घेतला. गाजुदीखान औरंगाबादेस आले. त्यांणीं सहा सुभे दक्षिणचे [यांचा] सुभा करावा असा [बेत केला] तों निजामअल्लीचे मातुश्रीनें [त्यांस] भोजनास बोलावून विष घालून मारिलें. फौज लुटून घेतली.

रघुनाथपंत दादासाहेब अमदाबादेस रवाना केले आणि नानासाहेब व भाऊसाहेब भालकीहून कूच करून दर मजल कर्नाटकांत जाऊन, श्रीरंगपट्टण आदिकरून संस्थानी यांस जरब देऊन, खंडण्या घेऊन, मातबर पैका मिळवून, पुण्यास आले. श्रीपतराव प्रतिनिधि यांचा काल जाला. दादोबा

---

१३. इ. स. १७६२ त

१४. वस्तुतः अदवानीस बसालतजंग होता.

१५. इ. स. १७५२ त.

१६. इ. स. १७५८ त.

१७. इ. स १७३६ त.

प्रतिनिधि यांस वस्त्रें झालीं. दादासाहेब दर मजल अमदाबादेस जाऊन शत्रूचें पारिपत्य करून पुण्यास तिसरे वर्षीं दाखल झाले. करनाटकांत संस्थानी पाळेगार मवासगिरी करीत होते त्यांचीं संस्थानें मजबूत व तोफांशिवाय जेर व्हावयाचीं नाहींत यानकरितां तोफखाना व गाडद पाहिजे. [ह्मणून] नवीन तरतूद करून दरसाल करनाटकांत स्वारी करून सौंदे, बिदनूर, सावनूर, श्रीरंगपट्टण, चित्रदुर्ग वगैरे संस्थानी यांस जरब देऊन खंडण्या मातबर आणिल्या. संस्थानिक शरणांगत झाले. करनाटकचे पाळेगार कोणास रुजू नव्हते. ते श्रीमंतांनीं मोठ्या पराक्रमावर पादाक्रांत करून राजे महाराज यांचे राज्याची अभिवृद्धि केली. नाना व भाऊ हुजुरात घेऊन कोंकणांत गेले. हबशी कुलाबा व जंजिरा किल्ले बळकावून कोंकणचा पैका घेत होता. त्यास कृष्णराव चिंचोडकर पागेंत होते त्यांजबरोबर फौज देऊन हबशावर पाठविले. त्यांणीं हबशी यासि लढाई करून जेर केला. आणि हबशाशीं पांच लाख रुपये खंडणीचा करार करून कृष्णराव चिंचोडकर हे श्रीमंतांजवळ दाखल झाले. त्यांनीं मेहरबान होऊन बिनीवाले हा किताब देऊन बिनीचें काम सांगितलें. तेथून नाना व भाऊ कूच करून गुजरायप्रांतीं गेले. तेथें दमाजी गायकवाड दाभाडे यांचे हातचा सुभा होता. त्याजपाशीं चाळीस हजार फौज होती. तो लढाईस आला. तेव्हां नानाभाऊंनीं विचार करून, फौज त्यापाशीं फार आहे, मुलुख गिराशांचा कठीण, याजकरितां लढाई न करितां, सामदाम दंड भेद करून, हस्तगत करावा [ असें मनांत आणून ] तेव्हां सल्ल्यावर गोष्ट टाकून सल्ला करून बेलभंडार केला कीं, तुमची गुजराथ तुम्हांकडे ठेवितों. असें ह्मणून फौजेस फितूर करून धरून घेतला. गायकवाड यांसि बोलले कीं, तीन कोटींचा मुलुख आहे. तुम्ही आपले खर्चापुरता ठेवून बाकीचा ऐवज राजाकडे द्यावे. फौजेची नालबंदी कापड रोजमुरा सरकारांत मजुरा देऊं. दमाजीनें ऐकिलें नाहीं. हट करून पुण्यास हवेली बांधून राहिला. त्या प्रांतीं सरकारचे ममलेदार पाठविले. सुरतअठ्ठाविशीचे रुपये नानांकडे पाठविले. शाहुराजा यांस व्यथा प्राप्त होऊन दोन महिने हैराण राहिले. नंतर अवतार समाप्त जहला. तो कधीं तर शके १६७१ शुक्ल नाम संवत्सरे मार्गशीर्ष वद्य १२ [ या गेर्जी ] महाराज शाहु समाप्त जाले. राज्यकारभार चालूच होता.

---

३८ श्रीपतरावानंतर त्याचा बंधु जगजीवन यास प्रतिनिधिपद मिळालें. तो इ. स. १७५४ त वारला.
९. इ. स. १७५४ त.

## रामराजे शके १६७१-१६९९ म्ह० इ० स० १७४९-१७७७.

नंतर राजे राजाराम यांचे पुत्र शिवाजी राजे यांचे पुत्र रामराजे बालेघाटीं होते. ते बारशीपानगांवाहून आणून नानासाहेब आदि करून सर्व कारकून सामोरे जाऊन घेऊन आले. ते सालीं माघ शुद्ध ५स राज्याभिषेक होऊन तख्तारूढ झाले.[40] दादासाहेब हिंदुस्थानचे स्वारीस गेले होते. बाळाजीपंत नाना पुण्यास होते. मल्हारराव होळकर आपली फौज घेऊस नजीकच होते. तेव्हां बाळाजीपंत यांस पुत्र सुमारीं:—

| | |
|---|---|
| १ वडील विश्वासराव[41] | १ धाकटे माधवराव |
| १ मोरोबा (लहानपणीं मृत्यु पावले) | १ नारायणराव |
| २ | २ |

तेव्हां संस्थानाचा वगैरे बंदोबस्त नानांनीं केलाच होता. तेच मानकरी सरदार दुसरी पिढी, अष्टप्रधान दुसरी पिढी, चालली. कान्होजी भोंसल्याचे रघूजी भोसले. राणूजी कवडे यांचे आवजी कवडे जाले. येशवंतराव घोरपडे यांचे मुरा[illegible] घोरपडे. पिलाजी जाधवराव यांचे आपाजी जाधवराव. गोखरोजी [illegible] यांचे सोनाजी भा कर. जोतीबा पाटणकर यांचे राहिरोजी पाटणकर. रंभाजी निंबाळकर यांचे नानाजी निंबाळकर. निजाम उल्मुल्खाचे मागें निजामअल्लीखां, असे नूतन सरदार जाले. मग नानासाहेबांनीं विश्वासराव यांजकडून प्रथम मोंगलांवर स्वारी करविली. दरमजल औरंगाबादेस गेले, तेव्हां निजामअल्लीखां औरंगाबादेस गेले होते. त्यांशीं युद्धप्रसंग दोन महिने होत होता. रामचंद्रराव जाधव दोन हजार फौजेनिशीं भालकीहून नबाबास सामील येत होता. त्याची बातमी येतांच विश्वासराव यांनीं दत्ताजी शिंदे पांचसात हजार फौजेनिशीं त्याजवर पाठविले. तेव्हां रामचंद्र जाधवराव, [illegible]कारचें ठाणें सिंदखेड्यांतच होतें, त्या ठाण्यांत शिरले. दत्ताजी शिंदे जाऊन ठाण्यास मोरचे देऊन बसले, याजकरितां निजामअल्लीखां फौजे सुद्धां जाधवराव यांस सामील करून घ्यावें या बेतानें चालले, त्यांचे पाठीवर विश्वासराव ही चालले, डाव पाहून लढाई होत होती. नबाब सिंदखेड्यास जाऊन, खासा अंबारी सिंदखेड्याचे दरवाज्याजवळ नेऊन, जाधवराव

४०. या वेळीं रामराजे यांचें वय तीस वर्षांचें होतें असें मल्हार रामराव चिटणीस म्हणतात.

४१. विश्वासराव, माधवराव, व नारायणराव या त्रिवर्गाचा जन्म अनुक्रमें शके १६६४, १६६७, व १६७४ या वर्षी झाला होता.

यांस वाड्यातून काढून, माघारे फिरले. ते दिवशीं सरकारचे सरदार यांनीं लढाईचें तोंड लावून प्रहर दीड प्रहर मातबर लढाई केली. नवाब जेर करून त्यांजपासून पंचवीस लक्षांचा मुलुख घेऊन विश्वासराव गंगातीरास आले. नानासाहेब व भाऊसाहेब दरमजल पुण्यास आले.

दसरा जाल्यावर कर्नाटकचे स्वारीस चालले. कृष्णातीरास गेले. त्या वर्षीं सिंहस्थ होतें. याजकरितां कृष्णातीराहून महादाजी आबाजी यांजबराबर फौज तोफखाना देऊन कर्नाटकांत रवाना केले. श्रीमंत त्र्यंबकेश्वरीं गेले. महादाजी आबाजी कर्नाटकांत जाऊन, संस्थानी यांस शह देऊन, खंडण्या घेऊन पुण्यास आले. दादासाहेब हिंदुस्थानांत होते. श्रीमंत दसरा करून श्रीकृष्णातीरास गेले. तेथें दादासाहेबांचें दुसरें लग्न करून दरमजल कर्नाटकांत गेले. जानोजी भोंसले सेनासाहेब सुभा आणिले. कर्नाटकापुढें पाळेगार मवासी कंटक होते. त्यांस आणून जेर केलें. त्या मातबर प्रांतांतील घेऊन आषाढमासीं पुण्यास आले.

भाऊसाहेब स्वारी तयार करून भागानगराकडे चालले. नवाब निजामअली भागानगराहून दरमजल पुढें आले. उदगिरीस उभयतांची गांठ पडली.[४२] तेथें लढाई सुरू जाली. श्रीमंत विश्वासरावसाहेब समागमें होते. दोन महिने सडे स्वारीनें रात्रंदिवस घोड्यावर जीन ठेवून नवाबाचीं गांवें लुटून फस्त केलीं. नवाब उदगिरीचे ठाण्याकडे चालले. तों भाऊ यांनी व विश्वासराव यांनीं दोन प्रहरचे समयांत तोफांची कारागिरी बहुत करून हल्ला केला. तोफा व बाण व जेजाला व बंदुखा यांचा मार अति निकरानें केला. ते समयीं नवाब जेर करून साठ लक्ष रुपये खंडणी घेतली आणि तह करून पुण्यास निघून आले.

दादासाहेब हिंदुस्थानाची स्वारी करून तमाम मुलखाच्या खंडण्या घेऊन पुण्यास आले. दादांचे स्वारीचा तोफखाना जालमवाड्यास ठेविला. पर्वतीचे दर्शनास गेले. ते वेळेस श्रीमंतांची फडनिशी जनार्दनपंत यांजकडे होती. त्यांचें उपनाम भानु. मुत्सदी वगैरे सखारामबापू होते. राज्यकारभार चालत होता.

दुसरे वर्षीं नानाभाऊंनीं विचार करून, कर्नाटकप्रांतीं मोहीम करावी अशी मसलत ठरवून, दसऱ्याचे मुहूर्तें गारपिरावर ढाला दिल्या. कुल फौज जमा केली. नालबंदी देऊन कूच करून पंढरपुरास आले. तेथून वकील मोंगलाकडे पाठविला. घांसदाणा घेऊन, कूच करून, तुळजापूर घेऊन, तेथून कूच

४१. इ. स १७५१ त. | ४२ इ. स. १७६० त.

करून, सावनुरापासून दोन कोसांवर उतरले. रात्रीं पन्नास हजार फौज घेऊन शहराभेंवतीं फिरों लागले. मोरचांचें संधान किल्लयावरील गोळ्यामुळें न होई. तेव्हां फौजा नदींत उभ्या करून सड्या स्वारीनिशीं दुसरे दिवशीं मोरचे बागलईकडून काईम केले. तीन महिने लढाई होत होती. टेंकडीवर मुषाफरजंग दोन हजार फौजेनिशीं होते. तोफांची मारगिरी सावनूरवाल्याकडून होत होती. तळ्याचें पाणी आटलें. सोनाजी भापकरानें खिसमतगारास पाणी मागितलें. त्यानें एका रुपयाचे तांब्याभर पाणी विहीर भेटली होती तिचें आणून दिलें. हें भाऊसाहेबांनीं पाहिलें. तेव्हां सोनाजी भापकरांनीं हल्ला करावयाचा विचार करून दुसरे रोजीं फौज तयार करून शेंदोनशें हत्ती पुढें उभे केले. सोनाजी भापकर चार हजार फौज घेऊन टेंकडीवर मुषाफरजंग याजकडे गेले. मुषाफरजंग पळोन शहरांत गेला. दोन हजार फौज त्याची होती. ती कापून काढिली. तोफा घेऊन टेंकडी सर केली. किल्ला जेर केला. दुसरे दिवशीं सावनूरचा वकील आला. नंतर तोफा बंद केल्या. वीस लक्ष रुपये खंडणी घेऊन नानाभाऊ कूच करून चित्रदुर्गास आले. तेथें खंडणी घेऊन पट्टणास आले. तेथून पठाण येऊन भेटला. खंडणी पांच लक्ष रुपये घेतली. तेथून कूच करून श्रीशेष यास आले. तेथील खंडणी घेऊन तुंगभद्रातीरास उतरले. फौज श्रीरंगपट्टणास पाठविली आणि कूच करून कावेरीस उतरले. दहा दिवस मुकाम केला. प्रांत लुटला गेला. पठाणाकडे कुंभारराजानें वकील पाठविला. दाहा लाख होन रोख खंडणी घेऊन, हत्ती भरून, कूच करून, श्रीशेष यास आले. तेथून बळवंतराव याजबरोबर चाळीस हजार फौज देऊन कडपेंकनीळ्यास पाठविले. तेथील पठाण दोन दिवस लढाईस आले. मग सात लाख रुपये खंडणी घेतली. बळवंतराव कूच करून घटप्रभेवर श्रीमंतांचे लष्करांत दाखल झाले. तेथून नानाभाऊ कूच करून अखेर सालीं पुण्यास आले. मुलूखगिरी चांगली झाली. टका बहुत मिळून फौजेची समजूत करून आपल्या घरास पाठविली.

श्रावणमासीं ते सालीं परम हर्षयुक्त ब्राह्मणांस दक्षणा दिली. ऐशी उमर याचे पागेचीं शिंगरें आलीं. त्यापासून सातशें चांगलीं शिंगरें पन्नास कवडी याचे पागेंत ठेवून बाकी शिंगरें बावन पागेंत दिलीं. हत्तीघोड्यांस नवीचे साज करविले. हत्तींस झुला जरीच्या करविल्या. एके दिवशीं दादाभाऊ हौदावर माशांचा तमाशा पहात बसले होते. दादासाहेबांकडील तोफखान्याचें दरोग्यानें, एके महिन्याची खर्चाची याद तीस हजार रुपयांची चावरात झाली,

४४. हा निजाम उलमुलकाचे मुलीचा मुलगा.

तोफखान्याकडील लोकांस रोजमुरा द्यावयाचा आहे, याजकरितां साहेबांस विनंति केली कीं, भाऊसाहेबांचें देणें करून घ्यावें म्हणजे नानासाहेब यांजकडे नेऊन नानासाहेबांचें देणें करून घेतों. नंतर साची चिठ्ठी करून घेऊन जामदारखान्यांतून ऐवज घ्यावयास येईल. गितलें. त्याजवरून राघोबा दादांनीं याद घेऊन भाऊसाहेबांचे हातं भाऊ याद पाहून बोलले कीं, तुम्ही स्वतां सुभाहिंदुस्थानच्या पांच लुखगिऱ्या केल्या. परंतु लाखपन्नास हजार रुपये जामदारखान्यांत ठ हींत. यंदां हिंदुस्थानांत आम्ही जातों. तुम्हीं नानासाहेबांजवळ असावें.

असा उल्लेख करून नाना पुरंदरे व बळवंतराव व त्रिंबकराव मामा यांस व कृष्णाजीपंत चिंचोडकर बिनीवाले यांस विचारून स्वारीचा निश्चय केला आणि सरदार लोकांस पत्रें लिहून पाठविलीं. शिपाई धनगर मल्हारराव होळकर तरवारबहादूर हे माळवे प्रांतीं आपलें ठाणें बसवीत होते. श्रीमंतांनीं होळकरास सरंजामास मुलूख दिला. पुण्यानजीक वाफगांव वगैरे येथें ठाणीं बसविलीं. माळवे प्रांतीं होळकरास सरंजामास महाल देविले व खानदेश प्रांतीं महाल होळकरास दिले. तेथें ठाणीं होळकरांनीं बसविलीं. होळकर माळ्यांत होते. रामपूरवाले राव यांच्या व मल्हारराव होळकर यांच्या लढाया होऊन रामपुरा होळकर यांनीं घेतला. ठाणें बसविलें. आणखी यांनीं मुलूख काबीज करून सोडविला. ठाणीं बसविलीं ते माळवे प्रांतीं छावणी करून होते. नारो शंकर यांजकडे श्रीमंतांनीं खानदेश प्रांतांतील महाल सरंजामास दिले. नारो शंकर आपलीं ठाणीं खानदेश प्रांतांत बसवीत होते. मालेगांवचा किल्ला बांधिला. ते खानदेशांत होते. जनकोजी[२५] शिंदे यांजकडे मुलूख सरंजामास श्रीमंतांनीं हिंदुस्थानप्रांतीं दिला. तेथें ठाणीं बसवावयाकरितां गेले. ठाणीं बसविलीं. आणखी तिकडे राज्य काबीज करून ठाणीं बसविलीं. शिंदे हिंदुस्थानांत होते. या सर्व सरदारांस पत्रें गेलीं आणि भाऊ साहेब यांणीं स्वारीचा निश्चय केला. नानासाहेबांस श्रुत केलें. "उत्तम" म्हणोन उत्तर दिलें. नंतर स्वारीची तयारी करून मुहूर्त पाहून दिल्लीकडे ढाला दिल्या. गारपिराचे मैदानांत डेरे दिले. महिनाभर मुक्काम करून राज्यकारणीं कारभारांत दादासाहेबांस माहितगार करून दिलें.

एके दिवशीं डेऱ्यास कुल सरदार बोलाविले. सर्व आले. भीड फार झाली. तितक्यांत मुषाफरजंगानें भाऊंवर कटार चालविली. परंतु चुकली. गवगवा झाला. लोकांस निरोप देऊन भीड दूर केली. कटारीचा शोध करून घ्या-

---

२५. हा जयाजीचा पुत्र इ. स. १७६१ त वारला.

नीत आणिली. चित्तांत ठेविली. अपशकून झाला म्हणून वाड्यांत आले. आठ रोजांनंतर चौसोपींत सभा केली. नामांकित सरदार बोलाविले. त्यांजबराबर मुषाफरजंग व इब्राहिमखां यांजलाही बोलाविलें. सर्व मिसळीप्रमाणें कचेरीस भाऊसाहेबांस मुजरे करून मिसळीकडे जाऊं लागले. तों इतक्यांत सहाजण माणसें पाठवून धरून आणून मुसक्या बांधिल्या. त्यांच्या वाड्यावर पांच हजार फौज पाठवून बायकामुलें हवेली जप्त करून उभयतांचीं डोकीं मारिलीं.

आठ रोजानंतर दुसरा मुहूर्त पाहून नानासाहेबांकडे आज्ञा घ्यावयास गेले. विनंति केली कीं, माझे बरोबर विश्वासराव धनी द्यावे. साहेबांनीं उत्तर केलें कीं, घरांत निरोप झाला म्हणजे त्यांजपासून मागून घेणें. नानासाहेब यांचे पायांवर डोई ठेवून निरोप घेतला. गोपिकाबाईकडे जाऊन पार्वतीबाईनें नमस्कार करून विनंति केली कीं, चिरंजीव विश्वासराव आमचे बरोबर धनी द्यावे. भाऊसाहेबांची भीड फार पडली. तेव्हां पार्वतीबाईचे हातीं विश्वासराव दिले. आमची तुमची ममता एक च आहे. सांभाळ करणें म्हणून सांगितलें. नंतर निघून गोपिकाबाईचे पायांवर डोई ठेवून निरोप घेतला आणि डेऱ्यास आले. नंतर कुल फौजेची हजेरी घेऊन खाशी हुजुरात, खाशी पागा, खासे हत्ती, जिलीब, ऐसा झाडून सरंजाम निवड करून घेतला. नाना फडणीस हे ही बरोबर आले. त्यांची मातुश्री ते ही आली. शके १६८१ प्रमोदीनामे संवत्सरे माघमासीं फौज सुद्धां कूच करून चा णचौऱ्याशीस आले. तेथून टोक्यावर गंगातीरास मुक्काम केला. तेथें फौज जमा झाली तिचा तपशील येणेंप्रमाणें:—

२०००० नारो शंकर यांची फौज. २५००० अंताजी माणकेश्वर ह्यांची फौज.
४५००० खाशी हुजुरात सरकारची. ३०००० मल्हारजी होळकर यांची फौज.
२०००० जनकोजी शिंदे यांची फौज. ५००० इब्राईमखां गारदी यांची फौज.
११० तोफा सुमारीं जबर.

१४५११०

एकूण एक लाख पंचेचाळीस हजार फौज व एकशें दहा तोफा. येणेंप्रमाणें हजेरी घेऊन गणतीस लाविले. नंतर दरकूच बऱ्हाणपुरास आले. आऊखानाचे बागेत उतरले. तेथून कोणी कोठें उतरावें हो मिसळ नेमून दिली. शिंदे यांनीं पुढें अघाडीस पांच कोसांच्या अंतरानें चालावें

[ यांनीं ] येऊन [ खंडणी ] दिली. तेथून बुंदेलखंडांत गेले. गोविंदराव खेर बुंदेले येऊन भेटले. पुढें जयपूरप्रांतीं गेले. राजेरजवाडे भेटीस आले. कमतेज खंडणी चुकवून गेले. पुढें दिल्लीचे रोंखे ढाल दिली. दिल्ली-अलीकडे चाळीस कोसांवर पातशाहाकडील जहानखान रोहिला तीस हजार फौजेनिशीं होळकर यांजवर चालून आला. त्यासी होळकर यांनीं लढाई देऊन लुटून फस्त केला. फत्ते जाहली. मल्हारराव होळकर यांसी घोडा व तुरा व वस्त्रें पाठवून सुभेदार ऐशी किताब देऊन कूच करून दिल्लीस गेले. पातशाह पळोन गिलच्याकडेस गेला. दिल्लींत अंताजी माणकेश्वर फौजेसुद्धां ठेविले. तेथून कूच करून दिल्लीआसपास प्रांत फिरून खंडण्या घेऊन कुरुक्षेत्रास गेले. तेथें पूर्वी कौरवपांडवांचीं युद्धें जाहलीं होतीं. ती जागा चांगली पाहून तेथें मुक्काम करून लाख फौज राहील असा खंदक खणून तेथें राहिले.

अबादअल्ली गिलच्या एक लाख फौज घेऊन यांवर आला. प्रथम खंडणीची तोड गिलच्यानें लाविली. रावसाहेबांची फौज पाहून खंडणी द्यावयास कबूल झाला. परंतु भाऊसाहेब खंडणी घेईनात. मल्हारराव होळकर यांनीं बहुत प्रकारें सांगितलें कीं खूब जाहली. आतां खंडणी घेऊन शह देऊन माघारें परतावें. परंतु भाऊसाहेब न ऐकतां अधिक आगळें बोलले. त्याजवरून मल्हारराव होळकर यांची मर्जी बहुत खट्टी जाहली. पुढें जाऊन लढाईचें तोंड लाविलें. दहा रोज नित्य लढाई जाहली. तिकडून गिलच्यांचा तोफखाना व इकडील यांचा तोफखाना इब्राहीमखां गारदी याचे स्वाधीन. असा परस्परें तोफांच्या मारागिरीनें गिलच्या जेर जाहला. सायंकाळीं दोन्ही फौजा मुक्कामास आल्या.

दुसरे दिवशीं शके १६८२ विक्रमनामसंवत्सरे पौष वद्य १३ ते दिवशीं दोन्ही फौजा सिद्ध होऊन सन्निध जाहल्या. गिलच्यांनीं दाटी केली. तोफांचा मार बंद झाला. गोळी सुरू झाली. तशांत गिलच्यांकडील गोळी विश्वासराव यांस लागून कामास* आले. अंबारीचा हत्ती बसविला. हें वर्तमान भाऊसाहेबांस आलें. ते हत्ती उतरून घोड्यावर स्वार झाले. इतक्यांत गिलच्या [यानें] जिवावर उदार होऊन गोळी, बरची, सांग, तरवार, चालवून घेतली. तेव्हां [illegible]च्या [illegible] लोकांस उभयतां आपले धनी दृष्टीस पडेनात. तेव्हां ह-

[illegible]

दादासाहेब राज्य करूं लागले. हें गोपिकाबाईस न साहे. म्हणून गोपाळराव हरी मिरजकर यांशीं विचार करून दादासाहेब यांस कैद करावें आणि राज्य रावसाहेब यांनीं करावें हा विचार केला तो दादासाहेबांस कळला. दादा स्नानसंध्या करीत होते. ती आटोपून पागेंत येऊन उपलाणी घोड्यावर बसून वडगांवास आले. मागून जिलीब वगैरे घोडे हत्ती दादांचे निसबतीचे होते ते आले. चारपांच हजार फौज घेऊन पुणतांब्यास गंगातीरास गेले.

इकडे माधवराव साहेब सखारामपंत बापू व मोरोबादादा फडणवीस यांचे विचारें कारभार करूं लागले. गोपिकाबाईचे चित्तानुरूप जाहलें. यानंतर निजामअलिखानबावा व विठ्ठल सुंदर व विनायकराव व मुरादखां हे चौघे [यांनीं] बसून विचार केला कीं गनिमाचे राज्यांत आपसांत फूट आहे. राघोबा व माधवराव यांचा आपसांत बेबनाव आहे. ऐशियांत स्वारी करून गनीम मोडून आपला अम्मल बसवावा. असा विचार करून फौज तयार करून निघाला. ते समयीं माधवराव यांजपाशीं पंचवीस हजार फौज व आनंदवल्लीस दादांजवळ वीस हजार फौज. बाकी सरदार आपआपले ठिकाणीं होते. मोंगल धारूरावर आला. पुण्यास खचित येतो अशी बातमी आल्या नंतर पुण्याचे लोकांस आज्ञा दिली कीं, जिकडे तुमची सोय असेल तिकडे जावें. पुणें उजाड करून ठेविलें. मोंगल धारूरावर आला. तेथून वानरा नदीवर उतरून अलीकडे आला. होळकर व गोपाळ हरी दादासाहेबांकडे गेले. दोघे एकत्र जाहले. फौज सुमारें ६०००० साठ हजार जमा जाहली. कूच करून अमदानगरास [illegible] मोंगल खरड्याचे मैदानांत येऊन पुढें आला. दादासाहेब व रा[illegible] फौज घेऊन भागानगरास गेले. मोंगल येऊन तळेगांवावर उत[illegible] विनायकराव पुण्यास आले. पुण्यास अग्न देऊन सिंहगडाखालीं गे[illegible] पेशवे यांचा जामदारखाना व शिलेखाना व दप्तरखाना भांडीं वगैरे गड[illegible] डोणज्यास होतीं तीं लुटून नेलीं.

[illegible]साहेब व रावसाहेब यांनीं हैदराबाद [illegible]ळून व लुटून परत केली [illegible] मोंगलावर परतले. हें वर्तमान मोंगलांनीं ऐकून आपण कूच करून मोंगल [illegible]दांचे रोखावर राक्षसभुवनावर मुक्काम केला. दादासाहेब तिकडून [illegible] मध्यें जानोजी भोंसले फौज सुद्धां होते.

[illegible]रूं लाग[illegible]

खंदकांत घोड्यासुद्धां उड्या टाकिल्या. खंदक भरून भूमी बरावर जहाला. भाऊंकडील दहाहजार सरदार फिरून फिरून लढत व भांडत. भाऊंकडील हजार दोन हजार माघारीं पळत. फिरून गिलच्याशीं लढाई देत. तेथें हजार पांचशें पडत. वीरश्रीचे सरदार जिवावर उदार. परंतु धीर सुटला. गिलच्या अनिवार करीत चालला. जनकोजी शिंदे पडले व सोनाजी भापकर चव्हाण वगैरे बहूत मानकरी पडले. शहाजी झालेर पुण्याचे पाटील ते ही पडले. भाऊसाहेबांचा ठिकाण नाहीं. येणेंप्रमाणें होऊन फौज बुडाली. भाऊसाहेब सुद्धां कुल सरदार गरदींत मेले. नाना फडणीस यांची मातोश्री गिलच्यांनीं नेली. असें होऊन भाऊसाहेब ते दिवशीं पानपतास बुडाले. गर्दी जहाली. हें वर्तमान पंधरा दिवशीं नाना साहेब व दादा साहेब यांस कळलें. तेव्हां त्यांनीं विचार करून गिलच्यावर स्वारी केली. पैठणास गेले. कित्येकांनीं वर्णिलें कीं आतां चार लाख फौज घेऊन जावें. तेव्हां भाऊंचा सूड घेऊन मुलूख आपला करावा. नाहीं तर जाणें ठीक नाहीं. पुण्यास जाऊन फौजा रवाना कराव्या अथवा दादा साहेब यांस पाठवावें. म्हणून महादोबा पुरंदरे यांनीं सांगितल्यावरून पुण्यास आले. भाऊंकडील फौज कांहीं मेली व कांहीं माघारीं आली. नाना फडणवीस आले व मल्हारराव होळकर आले.

नानासाहेब भाऊसाहेब व विश्वासराव यांचे शोकानें बागेंत जाऊन राहिले. तेथून पर्वतीस जाऊन राहिले. काळ समीप येतां समयीं माधवराव यांस दादांचे हातीं देऊन राज्य करावें म्हणून सांगून शके १६८३ वृषभनामसंवत्सरे ज्येष्ठ वद्य ३ भौमवास [illegible] त्यु पावले. दादांनीं शहरांत चवक्या पाठवून बंदोबस्ती केली. ते स [illegible] माधवराव पंधरा वर्षांचे होते. शके १६८३ ज्येष्ठ वद्य ७ स श्रीमंत [illegible] राव साहेब [ यांनीं ] सातान्यास जाऊन राजश्रीचें दर्शन केलें. नंतर प्रधा[illegible]ाचीं वस्त्रें बहुमानें दिलीं. घोडीं, जवाहीर, शिकेकटार, तरवार, वस्त्रें देऊन [illegible] प दिला.

मल्हारराव होळकर पुण्यास [illegible]ऊन हिंदुस्थानास गेले. आपले मुलख बंदोबस्त करीत चालले. ते हिंदुस्थानांत येऊन सरकार आलंपूर येथें सवासी झाले. त्यांची सून अहल्याबाई देशीं आली. तिला पुत्र माले[illegible] तो ही मेला. मग पुढें तुकोजीराव होळकर जहाले. ते येऊन [illegible] वणी करून राहिले. कृष्णराव [illegible]

पोंहचावें. दादांनीं जलदी करून चालून येऊन मोंगलाचे फौजेची गांठ घातली. लढाई जंगी होऊन हल्ला दादांनीं केला. मोंगलाची फौज लुटून फस्त केली. विठ्ठल सुंदर व विनायकराव व मुरादखां हे धरले. होणऱ्यांतील चीजवस्त त्यांनीं लुटून नेली होती ती झाडून पाडाव होऊन सांपडली. कांहीं मोंगलाची फौज गंगेंत बुडाली. त्रिवर्ग धरले. त्यांचीं शिरें कापून भाल्यावर लावून दादा व माधवराव मुक्कामास आले. फत्ते झाली म्हणून कूच करून दादा व माधवराव पुण्यास आले. फत्ते झाली.

तेथून कूच करून गणपतीचे रांजणगांवास दर्शनास आले. रावसाहेब यांनीं दादांस विनंति केली कीं, आपण पुण्यास चलावें, वडीलपणें जवळ असावें, मी सेवा चाकरी करून राज्यकारभार करीन. त्यांणीं उत्तर केलें कीं, मातुश्रीचे मर्जीनें घ्यावें. त्यांचे विचारास आलें तर मी जवळ च आहें. तूर्त मातुश्रीचे मनोदयानरूप आनंदवल्लीस राहतों. चिंता न करावी. पुण्यास लोकांस बोलावून वस्ती करावी. म्हणून रावसाहेब यांस सांगून कूच करून गेले.

रावसाहेब [यांनीं] पुण्यास येऊन गोपिकाबाईस सिंहगडाहून पुण्यास आणिली. सर्वत्रांस बोलावून हवेल्या नीट करविल्या. वस्ती बहुत जाली. मातुश्रीचें समाधान झालें. नारायणराव बल्लाळ [यांस] माधवराव यांजजवळ ठेविलें. राज्याचा बंदोबस्त झाला. गोपिकाबाई गंगेतीरीं पर्णकुटिकेंत जाऊन राहिली. नित्यनेम, अनुष्ठान, ब्राह्मणभोजन, दानधर्म, करून स्वस्थ होती. रावसाहेब पुण्यास राज्यकारभार चालवीत होते. दादासाहेब आनंदवल्लीस राहून त्या प्रांतीं वसूल घेऊन पंचवीस हजार फौज बाळगून होते. जयाजी शिंदे पडले. त्यापुढें पांचसात वर्षें कांहीं नाहीं. तेव्हां त्यांचा मूलें महादजी शिंदे गादीवर बसविले आणि काम कारभार करूं लागले. विसाजी कृष्ण चिंचोडकर बिनीवाले व रामचंद्र गणेश व तुके ळकर हुजुरातीची फौज देऊन हिंदुस्थानांत रवाना केले. रामचंद्र व विसाजी कृष्ण यांचें वांकडें पडलें म्हणून रामचंद्र गणेश प. ावून आणिलें. विसाजीपंत व होळकर [ यांनीं ] एका मतानें ़ केला आणि जरब बसविली.

इकडे दादांनीं अमृतराव द संकुटे यांचा घेतलौ. हें वर्तमान रावसाहेबांस कळलें. तेव्हां राव मुतसदी मिळवून विचार केला कीं. दादांनीं पत्र ेतला. हें चांगलें के

घुनरात घेऊन दादांवर स्वारी केली. चिंतो विठ्ठल दिवाण दादांकडील होते ते मारले. फौज व बाजार लुटून घेतला. दादा धोडपच्या किल्ल्यांत पळून गेले. रावसाहेब यांनीं हल्ला करून दादा व आनंदीबाई व पुत्र अमृतराव यांस पुण्यास घेऊन आले आणि जप्तींत ठेविलें. कोणाची अनुपत पडूं दिली नाहीं. दादा पांचखणी बंगला तयार करून सूर्याचें अनुष्ठान करीत होते.

त्रिंबकराव मामा हैदरखानावर कर्नाटकांत गेले होते. तेथें हैदरखानानें मामांस बारीमध्यें अडकाविलें. श्रीमंत यांस मामांचीं पत्रें गेलीं कीं कुमक पाठवावी. तेव्हां सरदार जानोजी भोंसले होते. भोंसल्यांनीं श्रीमंतांशीं करार केला कीं आपण पंढरपुरास यावें मी नागपुराहून फौज घेऊन येतों. पंढरपूरचे मुकामीं सामील होतों. असें ठरून भोंसले नागपुरास गेले. श्रीमंतांनीं फौज सुद्धां कूच करून पंढरपुरास मुक्काम केला. भोंसले लवकर आले नाहींत. म्हणोन बोलवावयास गोपाळराव यांस पाठविलें. गोपाळराव नागपुरास गेले. जानोजी बावा भेट घेईनात. तेव्हां सविस्तर गोपाळराव यांनीं लिहिलें. श्रीमंतांनीं त्रिंबकराव मामांची आस्था सोडून भोंसल्यावर स्वारी केली. गाईलगडाच्या चोहोंकडून फौजा पाठवून भोंसल्यास धरिलें. पंचवीस लक्ष रुपये घेऊन पंढरपुरास घेऊन आले. त्रिंबकराव मामा बारींतून निघून शिरेंचित्रदुर्गाकडे कडपेंकर्नोळें वगैरे पठाण संस्थानिक जेर करून, खंडण्या मातबर घेऊन, पुण्यास आले. रावसाहेब ही पुण्यास आले. रावसाहेब व मामा यांच्या भेटी झाल्या. वर्तमान परस्परें श्रुत केलें.

रावसाहेब बोलले कीं पेस्तर सालीं हैदरखानाचा समाचार घेऊं. चिंता नाहीं. असें बोलून सहाचार महिने स्वस्त राहिले होते. विसाजी कृष्ण व तुकोजी होळकर व शिंदे हिंदुस्थानांत गेले, दरमजल भागीरथीतीरास गेले. फत्तरगड भागीरथीपलीकडे होता. भागीरथी उतरून फत्तरगडास जाऊन लागावें आणि किल्ल्याचें पारपत्य करावें हा सिद्धांत केला. गंगेस पाणी फार होतें. तेव्हां श्रीची प्रार्थना केली. गंगेनें उतार दिला. गंगा उतरून पार जाऊन फत्तरगडावर जोईतखान लढाईत सन्मुख होऊन आला. त्यास शिकस्त करून फत्ते केला. खजीना वगैरे कुल सरकारांत आणून हिंदुस्थानांत गि[illegible] [illegible]ाई करून अंमल चांगला बसविला.

[illegible]कडे [illegible] जाऊन हैदरखानाशीं लढाई

केली. चतुर्थीचा उत्साह करून मुराररराव घोरपडे यांसि हिंदुपति सेनापती [ पद ] संताजी घोरपडे यांजपासून होतें तें त्यांचें त्यांस देऊन साडे चार लक्षांचा सरंजाम सोडला आणि कूच करून धारवाडास जाऊन किल्ल्यास मोरचे लाविले. देशींहून फौज ही आली. सुरंग, सलाबत, कुचे खणोन, धमधमे बांधून, त्यांजवर तोफा ठेवून मारगिरी केली. किल्ला जेर जाला. तेव्हां किल्लेदार कौल घेऊन किल्ला देऊन हैदरखानाकडे गेला. धारवाडाहून रावसाहेबांनीं कूच करून अनंतपूरचे किल्ल्यास मोरचे देऊन किल्ला जेर केला. हैदरखान बिदनूरचे आश्रयास गेला. त्याजकडील फौज पळून गेली. अडीच हजार फौज दहा हजार पायदळ राहिलें आणि बारीमध्यें अटकाविले. रावसाहेब [यांनीं] हैदरखानाचें पारपत्य करून पांच लक्ष रुपये खंडणी घेऊन कूच केलें. उपररायदुर्ग किल्ले घेतले. तेथून पुढें असकोट बाळापूर थोरलीं ठाणीं घेऊन अर्कोटावर सलाबत पडली व वकील महमदअल्लीखांचा आला. खंडणी घेऊन निघाले. बदामीची लढाई करून बदामी घेतली. ठाणें बसविलें. कर्नाटकप्रांतींचे जमीनदार, पाळेगार, मवासी, तमाम आले आणि [त्यांनीं] खंडण्या दिल्या. रावसाहेब पुण्यास आले. बारा वर्षें राज्य जरबी करून निर्वेध केलें.

पुढें रावसाहेब यांस क्षयाची भावना होऊन चैन पडेनासें जालें. तेव्हां थेऊरास जाऊन राहिले. महीधर गंगा विष्णु वैद्य यांनीं औषध दिलें. परंतु उपाय नाहीं. बहुत हैराण जाहले. शके सोळाशें (१६९४) चौऱ्याण्णव नंदन नाम संवत्सरे माहे कार्तिक कृष्ण ८ अष्टमीस कैलासवासी जाहले. रमाबाईनें सहगमन केलें. एकूण कारकीर्द [illegible]वराव साहेबांची झाली. दादोबा प्रतिनिधि कैलासवासी जाले. भवानरा[illegible] [प्र]तिनिधि विशाळगडकर हे दत्तक देऊन प्रतिनिधींचीं वस्त्रें देऊन प्रतिनिधि[पदवी] भवानराव यांस दिली आणि ताराबाईचा लेंक संभाजी याचा विशाळगडास काळ जाहला. हरिपंत फडके, [illegible] नी कृष्ण बिनीवाले यांचे शागीर्द, यांस मुत्सदगिरी जाहली. फौजे[illegible] करूं लागले. हिंदुस्थानांत होते. दादासाहेब [illegible]

एकेदिवशीं नारायणराव साहेब मातुश्रीचे दर्शनास गेले. चार दिवस राहिले. मातुश्री बोलली कीं कांहीं कीर्त्त वडिलांपाठीमागें कराल कीं चुलत्यामागें पोट भरून रहाल ! असें बोलली. तो शब्द मनांत धरून मातुश्रीची आज्ञा घेऊन पुण्यास आले. दादासाहेबांस सांगितलें कीं आपण स्नानसंध्या करून स्वस्थ असावें आम्ही कारभान्यांचे विचारें राज्य करतों. दादा "उत्तम" म्हणोन कारभार सोडून राहिले. कारभार केला असतां त्यास कोठें जमी, कोठें परवानगी, हें माहीत असतें. तें दादांस माहीत. नारायणरावसाहेब गैरमाहीत. तेव्हां दादांकड विचारावयास जात. दादा बोलत कीं तुम्हीं व कारभारी जसें कळेल तसें करावें. असें बोलत. तेव्हां नारायणराव रागें भरून दरबारांत येत. त्यानवरून त्या रागानें दादांकडे खर्चाची तंगचाई करूं लागले. त्यामुळें विपत्य होऊं लागली. जन्मापासून श्रीमंती केली. सबब सखाराम बापू बोकील यांस बोलावून सांगितलें कीं आम्हांस विपत्य होती याचा अर्थ काय ! असें दादांनीं सांगितलें. तेव्हां बापूंनीं व मोरोबादादांनीं बहुत प्रकारें नारायणरावांस सांगीतलें कीं माधवराव यांनीं वडिलांस बहुत मिजाजीनें ठेविलें होतें. त्यांची मर्जी रक्षून परम आनंदांत ठेविलें. त्याप्रमाणें तुम्हीं वडिलांचे मर्जीत असावें. असें सांगितलें. तें न ऐकतां अधिक उत्तर करूं लागले. तेव्हां दादांस व बापूंस व आनंदीबाईंनीं बोलावून आणून सांगितलें कीं बंदिवानांप्रमाणें आमचे हाल. विपत्ति सोसत नाहीं. आम्हीं तिथें प्राण देतों. असा निश्चय पाहून बापू घरास आले. सर्व मुत्सदी [यांनीं], नाना फडणीस वेगळेकरून, विचार केला कीं, नारायणराव लेंकरूं. सांगितलें न ऐकत व सोय सुमार जाणत नाहींत. यास काय करावें. तेव्हां सर्वत्रांनीं विचार केला कीं नारायणराव यांस धरावें. असा विचार केला व सुमेरसिंग व महमदखां व बहादुरखां व खरकसिंग व तुळाजी पवार हे बोलावून त्यांस गेतलें कीं नारायणराव दादासाहेबांचे बेनर्जीत. नसदी फार देतात. त्यांचे गावर गोष्ट आहे. तरी तुम्ही चौघे ग्रैं हजारानिशीं आहांत. तर नारायणराव यांसि धरावें. तेव्हां सुमेरसिंग बोलला काम आम्हीं करूं तर निमक हरामी होतों. मसलत सिद्धीस गेली तर ... गादीचा धनी कसें करील हें न कळे. तेव्हां गार्दी यांनीं ... लिहून

शिंदे नारायणराव यांचा निरोप घेऊन फौजेची तयारी करून हिंदुस्थानांत गेले. ते जाऊन तिकडे बहुत पराक्रम करूं लागले.

एके दिवशीं नारायणरावसाहेब चिंचवडचे देवास भेटावयास गेले. तेथें भोजन करून वाड्यांत आले. महालांत निजावयास गेले. हरिपंत फडके व चाफाजी खिजमतगार्‍य असे बातमी गारद्यांची घेऊन वाड्यांत शिरले. चाफाजीनें सांगितलें कीं, वाड्यांत गार्दी फार जाहाले. हरिपंत नारायणरावांचा निरोप घेऊन घरास आले. राव गार्द्यांची गर्दी पाहून फितूर असें समजून पळावयास लागले. मागें सुमेरसिंग व खरकसिंग व तुळाजी पवार लागले. चाफाजी आडवा जाहला. तो तेथें च मारला. दोन गाई पुढें आल्या. त्या तेथेंच मारल्या. नारायणराव दादासाहेबांचे गळ्यांत पडले कीं, मजला गार्दी मारतात. मला सोडवावें. हें राज्य दवलत तुमची आहे. तुम्ही सांभाळावें. असें म्हणून गळां पडले. तेव्हां सुमेरसिंगास दादांनीं सांगितलें कीं लेंकरास मारूं नका. तेव्हां सुमेरसिंग बोलला कीं, त्यांची फौज बाहेर पन्नास हजार जमा झाली आहे. त्यांस सांपडलों तर आमचे प्राणांचे ग्राहिक होतील. यास्तव तुमच्या करितां मारिलें पाहिजे. दादा बोलले कीं, मजला मारा परंतु रायास मारूं नका. तेव्हां सुमेरसिंग बोलला कीं, तुम्हांस मारून नफा काय? साप दुखवून सोडून द्यावा तशी अवस्था होईल. असें बोलून तुळाजी पवार यानें रायाचा पाय धरून ओढिला आणि सुमेरसिंगानें तेग्याचे हात मारिले आणि पोटांतून केशरी भात कोथळा बाहेर पडला. दुसरा हात मारिला तों शीर तुटून गेलें. तिसरा हात मारिला तों हात तुटून चौकांत पडला. सोप्यांत रक्ताचा प्रवाह चालला. सुमेरसिंगानें तेग्याचे हातानें तोडून पुरा केला. शके १६९५ विजयी नाम संवत्सरे भाद्रपद शुद्ध १४ सोमवारीं मारले गेले.

नंतर वाड्यांत नागव्या तरवारा झळकूं लागल्या. शहरांत हुल्लड होऊन फौज जमा झाली. दादासाहेबांस गारदी घेऊन चौसोपींत आले. नागव्या तरवारा करून शंभर गारदी दादांभंवते बसले. इतक्यांत बाहेर हुल्लड होऊन पन्नास हजार फौज बुधवारांत जमा झाली. आनंदरावजींनीं तोफा आणविल्या. परंतु दोघे खासे आंत असतां तोफा कोणावर टाकाव्या! तोफा आल्याचें वर्तमान गारद्यांस कळलें. तेव्हां दादांस सांगूं लागले कीं, बाहेर तोफा आल्या. पुढें विचार काय? आमच्या प्राणावर आलें. तरी अगोदर तुम्हांस मारून मग आम्हीं मरूं. तरी याचा बंदोबस्त करावयाचा असल्यास करावा. नाहीं तर मरण येईल. असें सांगितलें. तेव्हां दादांनीं घोरपडे व पुरंदरे बजाबा यांस बोलावून घेतलें आणि सांगितलें कीं, येथें प्रसंग असा गुजरला आहे. फौज माघारी

न्यावी. गारदी पैक्याकरितां तसदी करतात. यांची तजवीज असावी. असें ह्मणोन बाहेर पाठविलें. बजाबा व मालोजी [यांनीं] बाहेर येऊन सांगितलें कीं, एक मोहरा गेला. जें होणार तें जालें. तुम्ही आपले ठिकाणास जावें. पुढें कैसा बंदोबस्त होईल तो पाहूं. असें ऐकून फौजा माघाऱ्या गेल्या.

दुसरे दिवशीं गारद्यांनीं पैक्याचा नेट लाविला. तेव्हां मोरोबादादांस बोलावून तीन लक्षांची निशा गारद्यांस देविली. गारदी आपले घरास गेले. सूतक फिटल्यावर पर्वतीचें दर्शनास गेले तों विसाजीपंत बिनीवाले व तुकोजी होळकर व महादजी शिंदे हिंदुस्थानाची मोहीम करून पुण्यास आले. विसाजीपंतांनीं दादांस बहुत फजीत केलें. नंतर फौजेची समजावीस करून वीस लक्ष रुपये जामदारखान्यांत दाखल करविले.

नंतर राज्यकारभार दादासाहेब करूं लागले. सर्व मुत्सदी खुषीनें वर्तूं लागले. नंतर दसऱ्याचे मुहूर्तें डेरे देऊन फौज घेऊन कूच करून पंढरीस जाऊन मोंगलांवर स्वारी केली. दत्तक पुत्र अमृतराव यांस साताऱ्यास पाठवून महाराजांचीं पेशवाईचीं वस्त्रें घेऊन आले आणि दरकूच करून बेदरास आले. तेथें यांची व त्यांची गांठ पडून बेदरास वेढा घातला. ते समयीं नवाबांनीं वीस लक्षांची जागीर द्यावयाचा करार कृष्णराव बल्लाळ यांचे विद्यमानें करून दुसरे दिवशीं भेटीचा समारंभ झाला. स्नेहावर दृष्टि देऊन जाहागीर माफ केली. तेथून कूच करून महालांत जाऊन राज्याच्या अमलाचा बंदोबस्त करून भीमाकृष्णाकांडनूरसंगम उतरून कर्नाटकांत चालिले. मुरारराव घोरपडे मयामदार सेनापती यांसि भेटीस बोलावून नवाब बसालतजंग यांस भेटीस बोलाविलें. ते येऊन आपली तालुक्याची खंडणी चुकवून, तेथून कूच करून, तुंगभद्रेवर जाऊन, दर मजल बारी पावेतों गेले. महमदअलीखान याजकडून अर्काट प्रांतींच्या खंडण्या घेऊन हैदरखान याजकडून कर्नाटक प्रांतींच्या खंडण्यांचा ऐवज करार करून खंडणी घेतली. खंडणी घेऊन पंढरपुरास आले.

तेथून मुत्सदीमंडळ वगैरे राजश्री नानासाहेब फडणीस व सखारामबापू व मोरोबा दादा व कृष्णराव बल्लाळ व तुकोजी होळकर सुभेदार व महादजी शिंदे वगैरे सरदार सर्व शरीरप्रकृतीचें निमित्य करून पुण्यास आले. नानाफडणीस [यांनीं] मसलत बांधून, सर्व येक मतें करून, श्रीमंत मातुश्री गंगाबाई व सौभाग्यवती काकूबाई [यांस] वाड्यांतून काढून पुरंदरास नेऊन ठेविलें. गंगाबाई सहा महिन्यांची गरोदर होती. ती नानाफडणीस व सखारामबापू व तुकोजी

६४. यांचे वंशज वसई नजीक पापडी | या गांवीं राहतात.

होळकर सुभेदार यांनीं हिम्मत धरून पुरंदरीं ठेविली. नंतर त्रिंबकराव मामा व हरिपंत फडके यांस समागमें फौजा देऊन पंढरपूरचे सुमारावर पाठविले. कर्नाटकांतून दादासाहेब येऊन पंढरपुरावर लढाई झाली. त्रिंबकराव मामांस दादासाहेबांनीं पाडाव करून धरून नेलें. हें वर्तमान मोंगल व भोंसले व प्रतिनिधि यांस कळलें. नंतर सरकारचे फौजेंत हरिपंत फडके मुख्य करून देऊन नबाब व भोंसले व प्रतिनिधि परशुरामभाऊ वगैरे कुल् सरदार फौजे सुद्धां दादासाहेबांचे पिच्छेवर गेले. नंतर दादासाहेब निघून औरंगाबाद व बऱ्हाणपूरचे मार्गें नर्मदापार जाले. पिच्छेवर सरदार हरिपंततात्या व भोंसले व परशुरामभाऊ प्रतिनिधि वगैरे फौज लागली होती. मोंगल औरंगाबादेहून माघारे हैदराबादेस गेले. नर्मदेवर फौजा आल्या. हें समजून दादासाहेब धारेस आले. दादांची समजाविशी करावी म्हणोन नाना व सखारामबापू विचार करून वेरूळास आले. हें वर्तमान दादासाहेबांस कळलें. त्यांस संशय प्राप्त होऊन सौभाग्यवती आनंदीबाई यांस धारेस ठेवून आपण गुजराथ प्रांतीं गेले. हें वर्तमान सखारामबापू व नानांस कळल्यावर दादासाहेबांचे मागें फौजा पाठवाव्या हा विचार करून, हरिपंत व परशुरामभाऊ यांस लिहून, फौजा रवाना करून, आपण वेरूळाहून पुरंदरास आले. पाठीवर फौजा होत्या. त्यांची व दादांची लढाई होऊन दादासाहेब शिकस्त खाऊन पळाले. ते खंबाइतांत जहाजांत बसून मुंबईस इंग्रेजांकडे गेले.

नंतर इकडे सर्वप्रांचे पाळग्रहण करावयास शके १६९६ जयनाम संवत्सरे अधिक वैशाख शुद्ध ७ इंदुवार ते दिवशीं श्रीमंत सवाई माधवरावसाहेब यांनीं अवतार घेतला. दोन प्रहरीं जन्म जाला. तेणें करून स्वराज्यांतील प्रजे लहानथोरांस व परराज्यांतील लोकांस संतोष जाहला. तो कोठवर ल्याहावा ! सरदार व फौज दादासाहेब यांजपासून निघून हरिपंततात्यांस भेटली. याच सालीं शके १६९६ पौष शुद्ध ९ भोमवारीं सौभाग्यवती आनंदीबाईस बाजीरावसाहेब धारेस जाले.

श्रीमंत भाऊसाहेब यांचे नांवाचा तोतया जाला. त्याणें कोंकणांत अंमल करून तमाम किल्ले घेतले. पुंडावा करूं लागला, तो पुण्यास आणविला. त्याचें पारपत्य करते वेळेस लौकिकास्तव किल्ले रत्नागिरी येथें ठेविला. तो किल्लेदारांनीं शके १६९८ दुर्मुखनाम संवत्सरे चैत्र शुद्ध १ [रोजीं] बेडी तोडून मोकळा करून बाहेर काढिला. तेव्हां फौज जमा करून तमाम किल्ले [त्यानें] घेतले. सिंहगडपर्यंत किल्ले घेतले. नंतर सरकारची फौज [व] मुत्सदी जाऊन लढाई आश्विनशुद्धांत झाली. तोतयाचा मोड झाला. तो पुण्यांत महादजी शिंदे यांनीं

आणिला. सर्व पुण्यांत फिरवून शेखसल्ला पीर याजपाशीं मेकसूं घालून मारिला. सहाचौ महिन्यांनीं कोंकणचा अम्मल तोतयाचा उठून दिला.

नंतर शके १६९९ हेमलंबीनाम संवत्सरे या सालीं रामराजे यांस व्यथा जाली. नंतर स्वामींनीं विचार करून, महाराजांचें गोत्रपुरुष त्रिंबकराव भोंसले वावीकर यांचे पुत्र आणून, सुमुहूर्ते दत्तविधान करून, शाहूराजे नांव ठेविलें. मग शके १६९९ हेमलंबीनाम संवत्सरे मार्गशीर्ष शुद्ध पक्षीं रामराजे शांत जाले. कैलासवास केला.

## दुसरे शाहूराजे शके १७००-१७३०
## म्ह० इ० स० १७७८-१८०८.

नंतर शके १७०० विलंबीनाम संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य अष्टमी ते दिवशीं शाहू राजे यांस राज्याभिषेक करून सिंहासनारूढ केलें. साताऱ्यास होते. शके १७०० विलंबीनाम संवत्सरे या सालीं दादासाहेब इंग्रजांस घेऊन तळेगांवास आले. तेव्हां स्वामींनीं इकडून शिंदे व होळकर व हरिपंत फडके वगैरे सरदार यांस पाठविलें. लढाई बहुत जाली. इंग्रेज जेर झाला. तह करून मुंबईस गेले. दादासाहेब यांनीं महादजी शिंदे यांचे विद्यमानें गंगातीरास राहावें असा करार केला. शिंदे यांनीं फौज हरी बाबाजी याजबराबर देऊन [त्यास] रवाना केलें. हरि बाबा यांजपासून अमर्यादा जाली. तेव्हां दादा त्यांचें पारपत्य करून दरमजल सुरतेस गेले. त्याजवर गार्डर्* इंग्रज कलकत्याहून खुषकीनें सुरतेस गेले. तेव्हां सरकारांतून रामचंद्र गणेश व बाळाजी गोविंद यांनीं फौजसुद्धां वसईस जाऊन उपराळा करावा तों गाडर इंग्रज गोऱ्याचे शहरावरून मार्ग होता तो धरून बसला. तेव्हां लढाई पडली. मुंबईहून जहाजांवरून तोफा वगैरे जंगी सरंजाम आणून मोरचे देऊन वसई किल्ला इंग्रजानें घेतला. गाडर याचे फौजेची लढाई जंगी होऊ रामचंद्र गणेश ठार पडले. तेथून गाडर दरकूच बोरघाटास येऊन खंडाळ्यावर राहिला. हरिपंत फौजे सुद्धां कोंकणांत होते. ते वरघाटीं येऊन अलिकडे खंडाळ्याचे नजीक पांच कोसांवर राहिले. तेथून सडे स्वारीनिशीं जाऊन तोफा नेऊन लागू केल्या. त्यांवर टाकीत होते. तोफेची मारगिरी चालली. खंडाळें घाटांत अडचणीची जागा. फौजेचा उपाय न चाले. दोन महिने याप्रमाणें होत होतें. दाणावैरण कोंकणांतील इंग्रजांस येत होतें. मुंबईहून सामान येत होतें. याजकारितां हरिपंत यांनीं तुकोजी होळकर व परशुरामभाऊ घाटाखालीं पाठविलें. इंग्रजांची दाणावैरण बंद केली. तेव्हां

६५. इ. स. १७७८ त | * हा Goddard होय.

इंग्रजांस महागाईचा पेंच पडला. छबिन्याचे लोकांची नजर चुकवून, रात्रीं कूच करून, घाटाखालीं जाऊन, बेलापुरास गाडरानें मुक्काम केला. हरिपंत फौज सुद्धां घाट उतरून त्याचे पाठीवर पाव कोसाचे तफावतीनें राहिले. इंग्रज प्रहर रात्र रहातां चंद्र २६ रबिलाखरीं कूच करून चालिला. हरिपंत [यांनी] सर्व सरदार लोक हशमगड पार केला. लढाईचें तोंड लाविलें. चिकाटी बसविली. तुकोजी होळकर व परशुरामभाऊ पटवर्धन यांनीं अघाडीस तोंड लाविलें. इंग्रज लढाई करीत करीत दोन कोसांवर गेला. तेथून चंद्र २८ रबिलाखर मध्यरात्रीं कूच करून चालिला. ते समयीं सरकारचे लोकांनीं निकड करून लढाई लाविली. तोफेची व बाणांची मारगिरी केली. लढाई खडाजंगी होऊन इंग्रजांस जरबेंत कोंडून आगून शिकस्त करून लुटून फस्त केलें. तेव्हां इंग्रज मोठ्या यत्नानें पनवेलीस जाऊन पोंचला आणि [त्यानें] तह करून खंडणी कबूल केली. दादासाहेब यांस हवालीं केलें. कल्याण, वसई, बेलापूर, अमदाबाद, गुजराथपर्यंत त्यांनीं मुलुख दाबला होता तो सरकारांत परत दिला. हरिपंत तात्या यांनीं दादासाहेब यांस घेऊन कैद करून बंदीशाळेंत कोपरगांवीं गंगातीरीं ठेविलें. आनंदीबाईस धारचे किल्ल्यांतून आणून कोपरगांवास कैदेंत बाजीराव सुद्धां ठेविलें.

आपण श्रीमंत सवाई माधवराव व नाना फडणवीस सर्व मुत्सद्दी मिळोन राज्यकारभार पुण्यांत चालत होता. नारायणराव यांस ज्यांनीं मारलें ते गारदी आपले कुटुंब सहित लेंकरांबाळांनिशीं पळून जहाजांत बसून समुद्रांत गेले. तेव्हां नाना फडणीस यांचें लिहिलें इंग्रजांस गेलें कीं, आमचे चोर तुमचे कडे जहाजांत बसून आले [ आहेत ] त्यांस धरून आम्हांकडे पाठवून द्यावे. तेव्हां इंग्रेजांनीं त्यांस धरून पुण्यास पाठविलें. तेव्हां नानांनीं त्यांचे बहुतच हाल करून हातापायांस सुया टोंचून, हत्तीचे पायीं बांधून, सळया तापवून कानांत घातल्या. असे नित्य सहा महिने बहुत हाल करून त्यांस मारीत होते. सांडसानें त्यांचें शरीर तोडून चुन्याचें व मिठाचें पाणी शिंपडून जेरबंद मारीत होते. असे सहा महिने बहुत प्रकारें त्यांचे हाल करून त्यांस मारिलें. त्यांचे बायकापोरांचे गळे त्यांचे देखत कापून निर्वंश करून मग त्यांस मारिलें. नारायणराव यांस मारण्याचे मसलतींत जे मुत्सद्दी सखारामबापू व मोरोबादादा वगैरे मिळाले होते त्यांस धरून कैद करून पायांत बेड्या घालून किल्ले प्राप्त केलें. नानांनीं राज्याचा बंदोबस्त करून दरम्यान बंडें मोडून टाकिलीं. श्रीमंतांचे मुत्सद्दी खुशीनें वर्तूं लागले.

नंतर श्रीमंतांची मुंज जहाली. श्रीमंतांपाशीं नेहमीं बळवंतराव यांचे पुत्र

आपाजी बळवंत यांनीं असावें. श्रीमंत हौदांत पोहावयास शिकत होते. नंतर शके १७०४ शुभकृतनाम संवत्सरे माघमासीं लग्नसमारंभ होऊं लागला तेव्हां नबाब पोलातजंग ही लग्नसमारंभास बोलाविले. तेही आले. महाराज छत्रपति साताऱ्याहून आले. सर्व सरदार लोक बोलाविले. दिल्लीस पादशाहास अर्जदास्त पाठविले. पातशहा [यांनीं] वजीर सुजा उल्मुलुख यांस पाठविलें. सर्व राजे रजवाडे जमा झाले. मश्रुलमुल्क नबाबाकडील ते ही आले. लग्नाचा समारंभ नानांनीं करविला. कापडलीवर(?) आरशाचें वाड्यांत कागांत वधूमंडप फार चांगला तऱ्हेचा केला. कागदी बाग व मेणाचीं झाडें तऱ्हेचीं केलीं. अतसबाजी दारूचें काम फार चांगलें केलें. थोर चौरंग करून, माणसांचे डोईवर देऊन, त्याजवर कलवांतिणी स्वारी चालतां वधूमंडपा पावेतों जातां येतांना नाचल्या. कागदाचे बाग चालविले. सरकार वाड्यापासून वधूमंडपापावेतों चिराखदान हिलाल दुरस्ता सारें रात्र लाविले. शहरांत बाहेर नाकेबंदी करून फौज व पायदळ ठेवून बंदोबस्त केला. स्वारी चालावयाचे समयीं दुरस्ता गारदी ठेवून दाटी व गूलगलबा, कजियाकफावत होऊं न देतां बंदोबस्त केला. नूतनच कल्पना करून आरास फार चांगली केली. थोर थोर शिष्ट ब्राह्मणांस आमंत्रणें यथायोग्यतेनें पालख्या घोडीं पाठवून भोजनाचा समारंभ केला. दक्षणा वस्त्रें योग्यतेनें दिलीं. अलंकार हत्ती घोडे नजर देऊन, समारंभ पाहून, बहुत संतोष होऊन, स्वारी तयार करून, साताऱ्यास महाराज छत्रपति गेले. त्याजवर नबाबास मंडपांत नेऊन आरास दाखविली. भोजन करून, राग नृत्य पाहून, घोडा जवाहीर शिरपाव देऊन, नबाब मश्रुलमुलुख हैदराबादेस गेले. वजीर सुजा उल्मुलुख हत्ती घोडा शिरपाव जवाहीर देऊन दिल्लीस गेले. सरदारांची मुदारत यथायोग्यतेनरूप बहुमान करून निरोप दिला. नंतर सरकारपदरचे सरदार, मुत्सदी, सावकार, व कारकून व लहान मोठे व हशम गार्दी व शागीर्द पेशा कारखाने सुद्धां लहान थोरांस यथानुक्रमें भोजनास बोलावून, यथायोग्यतेनरूप ज्यास द्यावयाचें तें देऊन, बहुत प्रकारें मदारत ठेवून बहुमान केले. पूर्वीं स्वयंवर झालें त्याप्रमाणें हे ही स्वयंवर जालें.

सरदार महादजी शिंदे श्रीमंतांचा निरोप घेऊन हिंदुस्थानांत गेले. त्यांनीं जागोजागीं खंडण्या घेऊन जेर करून राज्य आक्रमिलें. गुलाम कादर यास लढाई देऊन त्यास मोडून लुटून मारिलें. त्याचें राज्य आक्रमिलें. हिंदुस्थानांत होते. छावणी केली. आगरें घेऊन ठाणीं बसविलीं. मथुरेस जाऊन छावणी करून राहिले. दिल्ली प्रांतीं असबतखां बंड होता. त्यास

६६. इ. स. १७७८ त.

मोडून लुटून फस्त केला. त्यानें पातशाहास कैद केलें होतें. त्या पादशाहास आणून तखतावर बसवोन त्याची वजीरात केली. दिल्लीस अम्मल बसवून अंतर्वेदींत* वगैरे हिंदुस्थानांत पराक्रम केला. पाटील बावांचें नांव बहुत झालें. बुंदेलखंड हें ही त्यांस मिळालें. सवाई माधवराव यांचे प्रतापेंकरून सर्व राज्य आक्रमिलें. हिंदुस्थानांतच होते.

हैदरखान मृत्यु पावला. त्याचा पुत्र टिपू सुलतान राज्यकारभार करीत होता. त्याची व इंग्रजांची चुरस लागून वांकडें आलें. त्यांच्या लढाया मुकाबले होऊं लागले. इंग्रजांची खराबी होऊं लागली. कोणी गोरे टांगले, कोणी मारले, मोठे सरदार कर्नेल जनरल यांस धरून तळून टाकिले. असें होऊन त्याची व इंग्रजांची चुरस लागली. लढाया होऊं लागल्या.

मग इकडे शके १७०५ चे सालीं मृत्यु पावले [ त्यांचा ] तपशील:—

१ पार्वतीबाई भाऊसाहेब यांची स्त्री १७०५.

१ सगुणाबाई जनार्दनपताचे स्त्री १७०५.

—
२

१ कोपरगांवीं गंगातीरीं श्रीमंत दादासाहेब मार्गशीर्ष वद्य ३ ते दिवशीं मृत्यु पावले. क्रियाकर्म गंगातीरीं बाजीराव यांनीं केलें, शके १७०५.

—
१.

—
३

दादासाहेब मेले तेव्हा आनंदीबाई गरोदर होती. शके १७०६ क्रोधीनाम संवत्सरे या सालीं माघ शु॥ पौर्णिमा [रोजीं] चिमाजी आपा कोपरगांवीं आनंदीबाईचे पोटीं निर्माण जाले. ते कैदेंत च होते. श्रीमंत व नाना फडणवीस पुण्यास राज्य करीत होते. सर्व जन सुखी केले. घाशी कोतवाल यानें तैलंग ब्राह्मण कोतवालचावडीचे खोलींत कोंडून मारिले. त्याजवर श्रीमंतांची इतराजी अवकृपा होऊन शहरांत फिरवून पांच पाट काढून पर्वती नजीक गुलटेकडीवर मारलें. पुढें राज्यकारभार चांगला चालला. राज्याचा भर भारी जाहला. मुलकांत आनंद जाहला. तुकोजी होळकर ही होते. व महादजी शिंदे मथुरेस छावणी करून होते. त्यांनीं मुलूक काबीज केला. दरोबस्त ठाणीं बसविलीं. इकडे शके १७१४ परिधावीनाम संवत्सरे [ या सालीं ] सौभाग्यवती रमाबाई माधवराव यांची स्त्री † ती परलोकास गेली. नंतर दुसरें लग्न फाल्गुनमासीं जालें. पहिल्या लग्नाचा समारंभ तसा न जाला. सुमारांत केलें.

---

* अंतर्वेदी=गंगा व यमुना या दोन नद्यांच्या चिमट्यामधील प्रांत.

† इ. स. १७८२ त.

नंतर महादजी शिंदे हिंदुस्थानांत होते त्यांजला सरकारचीं पत्रें पुण्याहून गेलीं कीं तुह्मीं यावें. त्याजवरून शिंदे कूच करून पातशाही वस्त्रे वजीरीचीं घेऊन, नालकी वाहान घेऊन, लाख फौजेनिशीं पुण्यास आले. पातशाही वस्त्रें व खिलत नालखीसह श्रीमंतांस अर्पण केलें. नंतर फाल्गुन मासीं रंगाचा बेत केला. पंचमीचे दिवशीं भोजन करून नंतर रंग खेळले. जागोजाग दुरस्ता रंगाचे बंब उभे केले. शहरांत स्वारी निघाली. श्रीमंत हत्तीचे हौद्यांत बसले व शिंदे ही एक्या हौद्यांत बसले आणि रंग व गुलाल यांची भडमार बहुत जाली. कलवांतिणींचे तक्तराव केले. सर्वत्रांचे हातांत पिचकाऱ्या व रस्त्यांत जागोजाग नानातऱ्हेचे रंग करविले. ते दिवशीं मोठा आनंद जाहाला. महादजी शिंदे व श्रीमंत परस्परें रंग बहुत खुशींत खेळले. नंतर स्वारी वाड्यांत आली. आठा चौं रोजानीं शिंदे यांणीं पर्वती नजीक हिंदुस्थानचे कारागिर आणून दारूची लंका करविली. तो महिनाभर तमाशा जाला. राज्याचा भर भारी जाला. पुढें कांहींएक दिवशीं शंभु वाघ महादजी शिंदे यांणीं हिंदुस्थानांतून आणिला होता तो श्रीमंतांस नजर केला व एक गेंडा ही दिला. पुढें महादजी शिंदे पुण्यास होते. नंतर शके १७१५ प्रमोदीनाम संवत्सरे माघ शुद्ध ११ ते दिवशीं सरदार महादजी शिंदे शांत जाले. मोठा शोक जाला. तेव्हां त्या दौलतीस खावंद कोणी पाहिजे [ह्मणून] सरकारांनीं व नानांनीं विचार करून त्यांचा लेकवळा गोत्रपुरुष दौलतराव शिंदे आणून दत्तविधान करून खावंद केले. शके १७१६ आनंदनाम संवत्सरे या सालीं हरिपंत फडके सिद्धटेकास मृत्यु पावले. त्यांचे पुत्र पुढें हरिपंतांचे जागीं फौजेचें काम जरीपटक्याचें करूं लागले.

शके १७१६ चे सालीं निजामअल्ली बोलले कीं, गनीमाचे राज्यांत आपला अम्मल बसवावा. गलीम बंड आहे ह्मणोन स्वारी करावी [अशी] सरकारांत अमर्यादा बोलूं लागले. गोविंदराव काळे वकील यांनीं श्रीमंतांस लिहून पाठविलें कीं येथील प्रसंग असे तऱ्हेचा आहे. स्वारीची तयारी होत आहे. सरकारांनीं फौजेची तयारी केली [तेव्हां] शिंदे[६८] होळकर[६९] पुण्यास च होते. गाईकवाड[७०] गुजराथ प्रांतीहून बोलाविले. भोंसले[७१] नागपुरीं होते. त्यांस बोलाविलें. परशुराम भाऊ, बाबा फडके, सरदार कुल मंडळी फौजे सुद्धां बोलाविली. स्वारीची तयारी होऊं लागली. जिउबा दादा शिंद्यांकडील पलटण कंपू सुद्धां अंतर्वेदींत होते. त्यांस ही बोलाविलें. ते पलटण सुद्धां दरकूच येऊन दाखल जाले. दारूची वगैरे

---

६८. दौलतराव.
६९ तुकोजी.
७०. गोविंदराव.
७१. रघूजी.

सरंजामाची व फौजेची तयारी करून कूच करून खरड्यांस दाखल जाले. निजामअल्ली हैदराबादेहून फौजसुद्धां कूच करून खरड्यांस दाखल जाले. श्रीमंतांनीं मुकाम करून मिसळ नेमून दिली. शिंदे यांणीं उजवे बाजूकडे पलटण सुद्धां उभे राहून लढाई करावी. डावे बाजूस भोंसले यांनीं आपले फौजेनिशीं उभे राहून लढाई करावी. होळकर व परशुराम भाऊ व बाबा फडके व गाइकवाड वगैरे मध्यें घेतले आणि चाल करीत करीत पाणी आपले पाठीस घातलें. जरीपटका बाबा फडके यांजकडे. त्याजवर लढाईची मसलत होऊन लढाई सुरू जाली. बाबा फडके लढाई करून शिकस्त खाऊन पळोन परशुराम भाऊकडे आले. श्रीमंत दहा हजार फौजेनिशीं मागें होते. मध्यें सांडणी स्वारांची डांक बसविली. परशुराम भाऊ यांजवर पठाण चालून जाऊन परशुराम भाऊ यांनीं लढाई सफेजंग करून पठाण मारिले. तेव्हां परशुराम भाऊवर तिकडील पठाण उठावणी करून चालून आले. ते समयीं होळकरांनीं व परशुराम भाऊंनीं लढाई मारली. परशुरामभाऊंकडील मोहरा फिरला आणि त्यांचे पुतणे पटवर्धन यांवर पडला. तिकडील पठाण बहुत जोरदार तिरंदाज शिपाई तेगे घेऊन धांवले. घोड्यासुद्धां तिरांनीं पाडाव करीत चालले. लढाई सफेजंग होत गेली. नानाफडणीस श्रीमंतांपाशीं होते. परशुराम भाऊ वगैरे सरदार पठाणांनीं मोडून शिकस्त केले. फौजेंत दंगा केला. हें समजतांच शिंद्याकडील जिवबा दादा यांनीं तोफांची मारगिरी सुरू केली. तिकडून भोंसल्यांनीं बाणांची मारगिरी केली. इकडून तोफांची मारगिरी व बाणांची मारगिरी यांनीं फौजेचा होष निघून गेला. नबाबाचे फौजेचा धुव्वा उडून गेला. गोळ्यानें लोक व घोडेस्वार व पायदळ हत्ती, उंट वगैरे छिन्नभिन्न झाले. कित्येक उडाले. बाणाचे मारगिरीनें कितीक जळाले. कितीक भाजून गेले. जिवबादादांनीं एक प्रहरांत सहा हजार गोळा मारिला. नबाबाचे फौजेचा भणाणा जाला आणि होष निघून गेला. नबाब निजामअल्ली अंबारींत होते तेव्हां गोविंदराव कृष्ण काळे वकील यांस बोलावून सांगितलें कीं, "बडा गजब हुवा. लढाई महकूब करा" असें ह्मणोन मोहऱ्याचा हत्ती माघारा फिरविला. गोविंदराव कृष्ण यांनीं चिटी लिहून नानांकडे सांडणीस्वार पाठविला आणि लिहिलें कीं, बाण व गोळे मना करावे. नबाब शिकस्त जाले. हे नानापाशीं चिटी पोंहचतांच गोळे व बाण मना करविले. नबाब जनानखान्यासुद्धां खरड्यांचे किल्ल्यांत [७२] गेले. सरकारची फौज जाऊन दाणापाणी बंद करून किल्ल्यास वेढा दिला. नबाबांनीं श्रीमंतांस

---

७२. इ. स. १७९५ ता० १५ मार्च.

बोलावून भेटीचा समारंभ जाला आणि नबाबांनीं शिक्केकटार श्रीमंतांचे स्वाधीन करून हें राज्य तुमचें असें म्हणोन साठ लक्षांचा मुलूख दिला. मश्रुलमुलुख कारभारी यांस जामीन ओलीस दिला आणि लिहून दिलें तेव्हां किल्ल्याचा वेढा उठविला.

श्रीमंत खरड्याहुन कूच करून आपले फौजेनिशीं सरदारांसुद्धां पुण्यानजीक आले. शहरांत चोंहींकडे चिराखदान दिवे लागले आणि बहुत शोभायमान करून जागोजाग दुरस्ता दारूचीं झाडें लाविलीं. अतसबाजी दारू उडवीत चमत्कार करून सर्व सरदार मुत्सदी वगैरे मंडळी मोठ्या आनंदानें पुण्यांत येऊन वाड्यांत दाखल जाली. शके १७१७ वैशाख शुद्ध १३ ते दिवशीं स्वारी फत्ते करून दाखल जाली. सर्वत्रांस पोषाख जवाहीर दिले. भोंसले नागपुरास गेले. गाइकवाड गुजराथेंत गेले. श्रीमंत यांनीं पुण्यांत राहून बहुत आनंद केला. सर्व जन सुखी केले.

नंतर पांच महिन्यानंतर गणपतीचे महालांतील दिवाणखान्यावरून अकस्मात, होणार तें, शके १७१७ राक्षसनाम संवत्सरे आश्विन शुद्ध १२ दशी भानुवासरे ते दिवशीं श्रीमंत हजारी कारंज्यावर वरून पडले. तेणेंकरून बहुत दुःखी होऊन कारंज्याची नळी मांडींत भरली. बहुत दुःखी होते. स्वतः नाना फडणीस यांनीं बहुत उपाय करून पाहिले. परंतु कांहीं न चाले. मग १७१७ राक्षसनाम संवत्सरे आश्विन शुद्ध १५ भौमवारीं कोजागरी सायंकाळीं श्रीमंत सवाई माधवराव पेशवे शांत झाले. कैलासवास केला. तेणेंकरून बहुतांस खेद जाला. नबाब निजामअल्ली यांस बहुत वाईट वाटलें. शहरांत वगैरे नाकेबंदी होऊन बंदोबस्त केला. नाना फडणीस ही बहुत घोरांत पडले. कांहीं सुचेना.

बाजीराव साहेब व चिमाजी आपा व दत्तक अमृतराव साहेब कोपरगांवास होते. त्यांस बोलवावयास परशुराम भाऊ पटवर्धन यांस पाठवून आणविलें. नानांच्या वगैरे भेटी जाहल्या. फाल्गुन वद्य ३ स दाखल जाले. नंतर नाना फडणीस फाल्गुन वद्य १४ स पुरंदरास आले. तेथून माहाडास पळून गेले. शके १७१८ नळनाम संवत्सरे वैशाख शु॥ ३ चे दिवशीं बाजीराव यांस दौलतराव आपल्या लष्करांत लोणीचे मुक्कामीं घेऊन गेले. नंतर परशुराम रामचंद्र पटवर्धन यांनीं रात्रीं लक्ष्मणराव रास्ते यांचे वाड्यांत आणिले. तेथें च ठेविले होते. नंतर शके १७१८ नळनाम संवत्सरे वैशाख व॥ ५ स चिमाजी आपाचें दत्तविधान करून चिमाजी माधवराव असें म्हणून पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. चिमाजी आपा राज्य करूं लागले. कार्तिक वद्य १४ भृगुवारीं

चिमाजी आपा भांबवाड्यास आले. नानाफडणिसाच्या मनाजोगें झालें. ते माहाडाहून येऊन भेटले. मशीर मोंगलांकडील पुण्यांत होता. तो ही येऊन भेटला. मग परशुराम भाऊ यांजवर बाबा फडके हे मसलत बांधून धरावें या बेतांत होते. त्यांस कळतांच परशुराम भाऊंनीं बाबा फडके यांस धरिलें. कार्तिक वद्य ७ स अमृतराव व बाजीराव व चिमाजी आपा कोंढव्यांचे मुक्कामीं भेटून एकत्र झाले. शिंद्यानें बाजीराव यांस धरून कैदेंत ठेविलें होतें. नाना फडणीस माहाडास होते. तेथून परशुराम भाऊ यांजकडे संधान लाविलें. परंतु न ऐकिलें. याजकरितां मश्रुलमुलुख यांजकडे राज्यकारण करून परशुराम भाऊस धरावें असा बेत केला. तो परशुराम भाऊस कळतांच आश्विन वद्य १२ स परशुराम भाऊ चिमाजी आपास घेऊन पळाले. मागें सरकारच्या फौजा लागल्या. तेव्हां जुन्नराजवळ लढाई होऊन धरिलें. धरून पुण्यास आणिलें. नानांनीं दौलतराव यांजकडील बहुत संधान केलें. परंतु न ऐकतां बाजीराव यांस राज्यावर बसवावें असा पक्ष दौलतराव शिंदे यांचा पडला. वरकड नबाब व भोंसले व गाईकवाड व तुकोजी होळकर सुभेदार वगैरे सरदार यांचा मनसोबा कीं, यांस गादीवर न बसवावें. तेव्हा दौलतराव यांचा आग्रह पडून, दौलतराव यांनीं पुण्यास आणून, शके १७१८ नळनाम संवत्सरे [यासालीं]सातार्‍याहून प्रधानपणाचीं वस्त्रे आणवून, मार्गशीर्ष शुद्ध ५ रविवारीं बारा घटका रात्रीं पेशवाईचीं वस्त्रें शिंदे यांनीं दिलीं. नंतर माघ वद्य ४ स एकवीस घटका रात्रीं वाड्यांत आले. दुसरे दिवशीं पंचमीस दाजी फडके यांची कन्या देऊन लग्नसमारंभ झाला. राज्य करूं लागले.

शके १७१९ पिंगल नाम संवत्सरे या सालीं मोरोबादादा यांनीं शिंदे यांजकडे राज्यकारण करून पौष शुद्ध १३ स नाना फडणीस यांस दौलतराव शिंदे यांनीं कैद करून नगरच्या किल्ल्यांत पाठविलें. शिंद्याचा कारभार सरजेराव घाटगे करूं लागले. शके १७२० कालयुक्त नाम संवत्सरे सालीं परशुराम भाऊ पुण्याहून निघाले व श्रावणमासीं सातारा परशुराम भाऊंनीं लुटला. मग तासगांवास आले. तों करवीरकर राजे यांनीं तासगांवचा वाडा परशुराम भाऊंचा जाळला. त्याजमुळें परशुरामपंत करवीरास वेढा देऊन बसले. पुढें तुकोजी बाबा होळकर सुभेदार हे वारले. त्या पुढें मल्हारराव व काशीराव होते. काशीराव व मल्हारराव असतां काशीराव होळकर यांस सरकारांतून वस्त्रें झालीं. तेव्हां काशीराव व मल्हारराव यांची चुरस वाढली.

---

७३. या वेळीं करवीरास संभाजी यानांवाचा राजा होता.

७४. इ. स. १७९७ त.

पुढें विठोजी होळकर फौज धरून धामधूम करूं लागले. त्यांचे चित्तांत कीं, सरदारी आपण करावी. मग त्यांस पुण्यास बोलावून आणविलें. त्यांस धरून हत्तीचे पायीं बांधून मारिलें. त्यांचा बंधु यशवंतराव होळकर तरवार बाहादूर येथून पळाला. आपला बंधु मारला तो दावा मनांत धरून खानदेशांत आला.

इकडे परशुराम भाऊ करवीरास वेढा देऊन बसले. शके १७२१ सिद्धार्थि-नाम संवत्सरे भाद्रपद वद्य ४ स करवीरकर राजे व परशुराम भाऊ यांची लढाई सफेजंग होऊन लढाईंत ते (परशुरामभाऊ) ठार पडले. शिंद्याच्या बाया दौलतराव यांस बदलून पठाण मुजफरखां यांस सामील होऊन बाहेर पडल्या. त्या फौज धरून लुटीत चालल्या. वांई प्रांतांत दंगा करून वांई प्रांत बायांनीं लुटला. शिंद्यांनीं बहुत प्रयत्न केला. त्या सांपडल्या. तेच सालीं अमृतराव साहेब यांच्या लष्करावर जाऊन शिंदे यांनीं बायांचे निमित्य लावून रावसाहेब यांचे डेरे जाळले. सर्व प्रांतांत दंगा चालला.

इकडे ते सालीं पुण्यास विठोजी होळकर यांस बाजीराव यांनीं मारलें. काशीराव होळकर व मल्हारराव होळकर यांचा पेंच पडला सबब शिंदे यांणीं काशीराव यांचा पक्ष धरिला. मल्हारराव होळकर यांची व शिंदे यांची लढाई भांबवाड्याचे मुक्कामीं भाद्रपद वद्य ९ स होऊन मल्हारराव ठार पडले व त्याच्या बारगीर ठार पडला. नंतर यशवंतराव होळकर हिंदुस्थानांतून फौज सुद्धां पुण्यांत आले. तेच सालीं टिपू सुलतान व इंग्रज यांची लढाई होऊन टिपू सुलतान ठार पडले. टिपूचें राज्य इंग्रजानें घेतलें. नाना फडणवीस शिंद्याचे कैदेतून मुक्त होऊन पुण्यांत आले. ते शके १७२१ सिद्धार्थी नाम संवत्सरे [सालीं] फाल्गुन वद्य १४स पुण्यास मृत्यु पावले. शिंदे यांचा कारभारी सरजेराव घाडगे यानें शिंदे यांच्या दौलतींतील प्राचीन कारभारी बाळोबा दादा व धोंडोबा दादा व नारायणराव बक्षी यांसि शके १७२२ रौद्र नाम संवत्सरे वैशाखमासीं मारिलें. ज्येष्ठ वद्य ११ [रोजीं] नानाफडणीस यांचे मंडळीस धरून नानांचे वाड्यांत आरब होते याजकरितां बाजीराव साहेब यांनीं वाड्यास गोळे मारिले. श्रावणमासीं इंग्रजांची व धोंडजी वाघ याची लढाई होऊन इंग्रजांनीं धोंडजी वाघ मारलें. दौलतराव शिंदे अलिजा बहादर व बाजीराव यांचें वैमनस्य पडलें. ते आपले फौजेनिशीं हिंदुस्थानास चालले. जातांना अजिठ्यास इंग्रजांची व शिंदे यांची लढाई झाली. शिंदे [यांनीं] निघोन हिंदुस्थानास जाऊन उज्जनीस छावणी केली. मागें एक कंपू पुण्यास शिंदे यांनीं ठेविला.

---

७५. इ. स. १८०० त.
७६. इ. स. १७९७ त.
७७. इ. स १७९९ त.
७८. इ. स. १८०० त.

यशवंतराव होळकर माळव्याहून फौजेसुद्धां पुण्यास आले. शके १७२४ आश्विन वद्य १४ स बाजीराव साहेब यांचा शिंदे यांचे कंपूसुद्धां होळकर यांशीं लढाई झाली. होळकर यांनीं पलटणें शिकस्त करून पुण्यावर मुक्काम केला. बाजीराव साहेब दरमजल पळून वसईस इंग्रजांचे आश्रयास गेले. होळकर व अमृतराव साहेब यांच्या भेटी झाल्या. उभयतांचे विचारें शहर गारद झालें. इंग्रज वस्ली* साहेब यांस चेनापटणाहून आणवून बाजीराव साहेब पुण्यास यावयास निघाले. होळकर पुण्याहून फाल्गुन व॥ ५ स निघोन हिंदुस्थानाकडे गेले. शके १७२५ रुधिरोद्गारी नाम संवत्सरे चैत्रमासीं बाजीराव साहेब व वस्ली इंग्रज पुण्यास दाखल झाले. आषाढमासीं सुरतेस होळकर गेले. नबाब निजामअल्ली श्रावणमासीं हैदराबादेस हक्क झाले. भाद्रपदमासीं व॥ १४ स नगरचा किल्ला शिंदे यांजकडून इंग्रजांनीं लढून घेतला. शके १७२६ रक्ताक्षी नाम संवत्सरे [सालीं] प्रांतांत दुष्काळ पडला. शेराची धारण झाली. अमृतराव साहेब गंगथडीस उपद्रव करून श्रीकाशीयात्रेस गेले. माघमासीं शिंदे यांनीं बाया हिंदुस्थानांत धरिल्या. वस्ली साहेब नागपुरास जाऊन, भोंसले यांशीं लढाई घेऊन, गायकवाड लुटून, तह करून माघारे पुण्यास येऊन, चेनापटणास गेले. यशवंतराव होळकर यांच्या व इंग्रजांच्या लढाया होऊन परस्परें तह ब्यास नदीचे कांठीं होऊन सलुख जाहला. यशवंतराव भानपुऱ्यास छावणीस आले.

बाजीराव साहेब प्राचीन चाल सोडून जुने सरदार व मुत्सदी वगैरे कुल अठरा कारखाने दूर करून नूतन चाल काढून वर्तणूक करूं लागले. बापू गोखले यांस कराडास प्रतिनिधि यांजवर पाठवून प्रतिनिधीस लढाई करून पुण्यास आणिलें. शके १७२८ त शाहू राजे सातारकर कैलासवासी झाले. त्यांस पुत्र तीन. पैकीं एक पुत्र वडील यांस शके १७३० या सालीं बाजीराव साहेब साताऱ्यास जाऊन सिंहासनावर बसवून त्यांस शाहू राजे यांचें नांव चालविलें.

## प्रतापसिंह शके १७३०-१७६१ म्ह० इ० स० १८०८-१८३९.

शके १७३१ युवनाम संवत्सरे ते सालीं गंगाधर शास्त्री निसबत गाईकवाड पुण्याहून आषाढ मासीं बाजीराव साहेबांच्या स्वारीबरोबर पंढरपुरास गेले. तेथें मारले गेले. इंग्रजांनीं हा आरोप त्रिंबकजी डेंगळे ह्यावर ठेवून भाद्रपदमासीं वसंतगडाहून [त्यास] स्वाधीन करून घेतलें. यशवंतराव होळकर किल्ले भानपुऱ्यास कैलासवासी जाहले. पुढें शके १७३७ युवानाम ते सालीं होळकर

---

* हा Wellesley होय.
७१. मद्रास.

८०. इ. स. १८०१ त.
८१. इ. स. १८११ त.

यांचे कारभारी बाळाराम शेट यांजवर फितूर होऊन ते मारले गेले. भाद्रपदमासीं त्रिंबकजी डेंगळे साष्टिहून इंग्रजांचे कारागृहांतून पळाले. मुलखांत पेंढारी येऊन धामधूम करूं लागले. माघ व|| १४ स पेंढारी कोंकणांत राजपुरीस जाऊन कोंकणपट्टी लुटून कल्याण प्रांतांतून माघारे पुण्यानजीक आले. तेथून नर्मदेकडे गेले. ते च सालीं इंग्रजांनीं नागपुरास पलटणें ठेवून चाकरी कायम नागपुरीं केली. बाजीराव यांनीं राज्याच्या बंदोबस्तास मुत्सद्दी व सरदार वगैरे फौजेनिशीं ठेविले. त्याचा तपशील:—

१ सदाशिव माणकेश्वर दिवाण. परंतु प्राचीन कथा करीत होते.

१ मुत्सद्दी रामचंद्र गोसावी पैठणकर.

१ सरदार मनोहर गीर गोसावी. त्यांची फौज नंगे गोसावी.

१ पलटणें व तोफखाना. रूपराम चौधरी गाडीवाला [ यानें ] फौज आठवड्याची ठेवावी. वरचेवर निरोप देत जावा.

येणें प्रमाणें राज्याचा बंदोबस्त करीत होते.

इकडे शके १७३९ ईश्वरनाम संवत्सरे वैशाख वद्य ८ गुरुवारीं कर्नल इस्मिथ व अलपिष्टण रसिडंट ह्यांनीं पुण्यास वेढा घालून त्रिंबकजी डेंगळे ह्यांनीं बंड केलें आहे ते स्वाधीन व्हावे याजकरितां अट घातली. नंतर सरकारांतून बाजीराव यांनीं त्रिंबकजीबद्दल रायगड व पुरंदर व सिंहगड हे किल्ले दरम्यान दिले. नंतर वेढा उठला. बाजीराव साहेब पंढरपुरास जाऊन माहुलीस आल्यापूर्वीं पलटणच्या खर्चाकरितां फोटसाहेब यांनीं नवीन पलटणें तीन तयार करविलीं. त्यांस खर्चास सरकारांतून दरमहा जात होता. मालकम साहेब ही हिंदुस्थानांतून पुण्यास येऊन अलपिष्टण साहेब यांस घेऊन माहुलीस बाजीराव साहेब यांजकडे गेले. परस्परें भेटी होऊन सफाईचें बोलणें जाहलें. मालकम साहेब यांनीं बाजीराव साहेब यांस राज्याचे बंदोबस्ताविषयीं सांगोन हुशार रहावें म्हणून सांगितलें. नंतर निरोप घेऊन पुण्यास उभयतां आले. मागाहून बाजीराव साहेब ही आले. नंतर आषाढ शुद्ध १२ स इंग्रजांनीं पलटणचे खर्चास बोर घाटापासून यावत् गुजराथ तहत माळव्याचे झांप्या पर्यंत मुलूख कूल् सरकारांतून दिला व दक्षिणेस वाकनदीचे पलीकडे तुंगभद्रे पर्यंत मुलूख सरकारांतून फौजखर्चास दिला. व नर्मदाउत्तरतीरापासून तहत मुलूख सरकारी इतल्लयाचा होता त्याच्या सनदा इंग्रजांस दिल्या. गोविंदराव काळे बारामतीहून आणविले. त्यांस सल्ला विचारला कीं पुढें कसें करावें ? त्यांनीं चाल सांगितली कीं सध्या इंग्रजांशीं लढाई करूं नये. शिंदे होळकर यांजकडे नालबंदी पाठवून दोन्ही सरदार राजी करावे आणि इंग्रजांशीं

सल्ला करून मसलतीवर टाकावें. असें सांगून बारामतीस गेले. श्रीमंतांनीं व बापू गोखले वगैरे सरदारांनीं फौज जमा करून इंग्रजांशीं बिघाड केला. नंतर १७३९ आश्विन वद्य ११ स सरदार लोक [ यांनीं ] फौज सुद्धां इंग्रजांचे छावणीवर हल्ला केला. इंग्रजांची छावणी लुटली. गणेशखिंडीवर लढाई सुरू जाहली. सायंकाळ पर्यंत लढाई होऊन उभयतां कायम राहिले. बाजीराव साहेब पर्वतीहून लष्करांत गारपिरावर आले.

इकडे नागपुरीं भोंसले यांची व इंग्रजांची लढाई होऊन इंग्रजांनीं भोंसले यांसि हस्तगत केलें. राज्य व दौलत घेऊन दुसरे भोंसले राज्यीं स्थापिले. इकडेस बाजीराव साहेब यांजकडील सरदार येरवड्याचे टेंकडी जवळ येऊन महांकाळी तोफ आणविली. नंतर लढाई सुरू झाली. सारे रात्र लढाई होऊन गोसावी व आरब यांनीं मारगिरी बहुत केली. पोट साहेब बाजीराव साहेब यांजकडील. परंतु लढाईसमयीं पलटणांसुद्धां इंग्रजांस सामील होऊन लढाई करूं लागले. इतक्यांत श्रीमंत बाजीराव साहेब लष्करांतून आपले लष्करासुद्धां पळोन निघून सासवडास गेले. हें वर्तमान इंग्रजांस कळतांच पिछावर पलटणें पाठवून, अलपिष्टन व बाळाजी नारायण यांनीं मार्गें शहरांत येऊन, शके १७३९ कार्तिक शुद्ध ९ सोमवारीं सरकार वाड्यावर आपला झेंडा लावून, शहरचा बंदोबस्त केला.

नंतर अलपिष्टन आपण कूच करून श्रीमंतांचे पिछावर गेले. श्रीमंत सातान्यास येऊन, महाराज प्रतापसिंह बंधूंसहवर्तमान आईसाहेबांसुद्धां समागमें घेऊन, पंढरपुराकडे गेले. पिच्छावर इंग्रज होतेच. तेथून उलटोन गंगातीरास आले. पिच्छाडी इंग्रज होताच. तेथून उलटोन ब्राह्मणवाड्याचे घाटानें येऊन मुक्काम केला. तेथें बापू गोखले यांचे पुत्र कैलासवासी जहाले. तेथून कोरेगांवास आले. पिच्छाडी इंग्रज होताच. त्यांची व यांची लढाई झाली. नंतर तसेच पंढरपूरचे रोखें गेले. नातेंपोतें येथें श्रीमंतांचा मुक्काम होता. तेथें महाराजांकडे फितूर होऊन राजे महाराज आईसाहेबांसुद्धां इंग्रजांस सामील झाले. हें वर्तमान बापू गोखले यांसि कळल्यावर त्यांनीं आपलें पथक सुद्धां उलटोन इंग्रजांशीं लढाई केली. गोखले लढाईंत ठार पडले. बाजीराव निघोन बागलकोटाकडे गेले. तेथें ही पिच्छा इंग्रजांनीं केला. महाराज आईसाहेबांसुद्धां सातान्याकडे रवाना केले आणि इंग्रजांनीं तमाम मुलुखांत ठाणीं बसवून किल्ले सर केले. अलपिष्टन साहेब [ यांनीं ] शके १७३९ माघ शुद्ध १५ मंगळवारीं सातारा किल्ला घेऊन बंदोबस्त केला. महाराजांस सिंहासनीं बसविलें. बाजीराव साहेब उलटोन गंगातीरास आले. तेथून

खानदेशांतून व वऱ्हाडांतून नागपूरचे रोखें गेले. तिकडून पलटणें आलीं. हें वर्तमान कळतांच माघारे फिरले. तेव्हां बऱ्हाणपूरचे रोखें आले. पिच्छाडीस पलटणें होतीं. नंतर बऱ्हाणपूर येथून निघून नर्मदेच्या कांठीं आले. नंतर मालकम साहेब माळव्यांतून जांबाचे घाटानें नर्मदेवर आले. तेथें बाजीराव साहेब व मालकम साहेब यांची उभयतांची सल्ला होऊन बाजीराव यांस आपले लष्करांत घेऊन आले. बरोबर श्रीमंत राजश्री चिमाजी आपा होते. ते इंग्रजांचे अनुमतें पुण्याकडे येऊन वसईस जाऊन राहिले. मालकम साहेब बाजीराव साहेब यांस घेऊन ब्रह्मवर्तास गेले. नंतर श्रीमंत चिमाजी आपा इंग्रजांचे विचारें श्रीवाराणसीस निघून गेले. एकूण अवल तागाईत अखेर पेशवाईची हकीगत झाली. पेशव्यांचें राज्य व दौलत कूल इंग्रजानें घेतली. शके १७३९ कार्तिक शुद्ध ८ ता० शु० ९ सोमवार. बखर समाप्त झाली. ही बखरेची नक्कल गणपतराव गोविंद बर्वे यांचे बखरेवरून केली असे. शुद्धाशुद्ध असल्यास लावून वाचावी.

समाप्त.



## मराठी साम्राज्याची छोटी बखर—परिशिष्ट. १.

### वंशवर्णन.

टिपण--छ. १८ जिलकाद सन सब्बां अशरीन मय्यांतैनवअल्लफ (१२२७.)
मूळ पुरुष शिवराव चितोडकर उदेपुरीं रहात होते. त्यांस पुत्र १ राम-
व, २ उदेसिंग, ३ भीमसिंग [असे] तिघे. पैकीं अकबर पादशाह फौज सुद्धां
ाला. [तेव्हां] लढाईत रामराव व उदेसिंग ठार झाले. भीमसिंग यानें तेथील
ाजा उदेसिंग यास घेऊन जाऊन भोंसचे किल्ल्यांत नेऊन ठेविला. सबब
ोंसले असें नांव झालें.

भीमसिंग यास पुत्र दोन. १ विजयभान राजा, २ रायभान. याचा वंश
हीं चितोडेस राहिला, कांहीं देशांत आला. जिथें असेल तेथें असेल.

विजयभान यासि पुत्र एक खेळकर्ण राजा. [ हा ] चितोडाहून या देशीं
ला. यासि पुत्र एक जयकर्ण राजा. यासि पुत्र एक महाकर्ण राजा. हा
जापुरांत होता. त्याजवर राजा कर्ण म्हणोन हिंदुस्थानांतून साठ हजार
त घेऊन आला. परंडेनजीक रणखांब रोवून त्यांची सात दिवस
ई होऊन उभयतां ठार झाले.

महाकर्णाचे पोटीं पुत्र एक राजा शिव झाला. तो भीमातीरीं डोहांत बु-
डून मेला भीमाखेट माहुली [एथें]. यासि पुत्र एक बाबाजी भोंसला होता. तो
वेडसर होता. यासि पुत्र दोन. १ मालोजीराजे वडील. २ विठोजी राजे
धाकटे. मालोजी यांस पुत्र एक शहाजी राजे झाले. यांसि पुत्र तीन. १
ंभाजी राजे लढाईत पडले. २ शिवाजीराजे शककर्ते. ३ व्यंकोजी राजे
चंदावरीं गेले. याचा तपशील. संभाजीस पुत्र एक उमाजी राजे वेडसर
ोता. यासि पुत्र एक जिजाजी भोंसले. मृत्यु पावले. नक्कल झाले. पुढें दत्तक
ापलकर यांचे घरांतील मुलगा परसोजी ओटयांत घेतला. एकूण एथचा
ा वडिलांचा. शिवाजी महाराज यांच्या वंशाचा तपशील अलाहिदा आहे.
रे व्यंकोजी राजे यांचा वंश हल्लीं चंदावरीं आहे.

विठोजी राजे बाबाजी यांचे पुत्र यांचा वंश. १ खेळोजी वडील. यांस अ-
जेब बादशहानें दिल्लीस नेऊन जिवें मारिलें. त्यांचें घर शंभुमहादेव
ापुर व गंगातीर येथें, कळस निगुडी भीमातीर एथें, दोनी गांवास रहातात.
ोजी राजे यांचा वंश वाडीनजीक श्रीगोंदे येथें रहातात. ३ तिसरा
चे वंशज ] हिंगणी बेरडी तर्फ पाटस प्रांत पुणें येथें पाटिलकी
न. चवथा पुत्र [ याचे वंशज ] मौजे देऊळगांव तर्फ पाटस प्रांत

पुणें येथें पाटिलकी करून आहेत. ५ पांचवा पुत्र [ याचे वंशज ] भोमरे तर्फ श्रीगोंदें येथें पाटिलकी करून आहेत. ६ सहावा पुत्र [ याचे वंशज ] नादंजन प्रांत कडवली येथें पाटिलकी करून आहेत. ७ सातवा पुत्र [ याचे वंशज ] मौजे मुंगी प्रांत शेवगांव गंगातीर येथें पाटिलकी करून आहेत. त्यांचे वंशीं मालोजी असत. ८ आठवे पुत्राचा वंश कान्हान तर्फ कडेपठार प्रांत पुणें नजीक जेजुरी [ एथें आहे ]. त्यांचे वंशीं महादाजी अंधळा आहे.

टिपण-वंशावळ-त्र्यंकोजी राजे चंदावरकर यांची. सुरूसन सब्बा अशरीन मयातैन व अल्लफ ( १२२७ ) छ. २० माहे जिलकाद.

त्र्यंकोजी राजे शहाजी राजे यांचे पुत्र. त्र्यंकोजी राजे यांचे पुत्र तुकोजी राजे. तुकोजी राजे यांचे पुत्र बावासाहेब महाराज. पुढें बावासाहेब यांची राणी सुजानबाई यांनीं दहा महिने राज्य केलें. नंतर समाप्त झाली.

रूपी आका म्हणून बटीक होती. तिचे पोटीं काटजी म्हणोन झाले त्यांनीं अकरा महिने राज्य केलें. नांव काट राजे म्हणून म्हणवून घेत केरूजी घाटगे बंदा म्हणोन कारभारी होते. पुढें बावा साहेब यांनीं र ठेविली होती. तिचे पोटीं प्रतापसिंग म्हणोन होता. सैद मसलत तेथें मुसलमान होत. राजे तक्तावर बसतांना ते जवळ येऊन नंतर बस अशी चाल आहे. त्या सैदानें मसलत करून बटकीचा वंश उपयोगी नाह म्हणोन बावासाहेब यांचे राखेचा पुत्र प्रतापसिंग यास बसवावा अशी योजन करून काटराजे यांचे आंगास तेल पहिलवान लावीत होते त्यांस फितवू त्यांजकडून मान मोडिवली. मग प्रतापसिंग यास बसवून सैदानीं घाटगे बंदा याचा गळा कापिला. पुढें प्रतापसिंग राज्य करूं लागले. त्यांची मातोश्री मोहिते यांचे घरची बटीक संक्रांतीचे तीळ घेऊन आली तों पलंगावर बसले होते. बावासाहेब यांनीं अंगीकार केला. प्रतापसिंग यांनीं राज्य दहा वर्षें केलें प्रतापसिंग यांस पुत्र दोन झाले.

१ तुळजोजी म्हणून पुत्र वडील झाले. त्यांनीं राज्य अकरा वर्षें के पोटीं पुत्र नाहीं म्हणोन सरफोजी राजे भोंसले यांचा पुत्र दत्तक घे आणि भाऊ अमरसिंग यांस बोलावून सांगितलें कीं, या मुलास गादीवर वून तुम्ही राज्य करावें. याप्रमाणें सांगून मृत्यु पावले.•• •• •• ••

२ दुसरे पुत्र अमरसिंग. यांचे मातोश्रीचें लग्नाचे वेळेस काटक कन्या ते देईनात तेव्हां प्रतापसिंगानें चौकी बसविली. मग सर्वत्र मुलीची मातुश्री व मुलगी राहिल्यावर •• •• •• तेव्हां आतां लग्न

...तले वेळेस कां नाहीं म्हटलें ! याजबद्दल काटकरांचे मुलीचें कटारीशीं केलें. तिचे पोटीं अमरसिंग झाले. त्यांनीं तुळजोजी मर- सरफूजी मूल घेतला होता त्यास कैद करून आपण राज्य बारा केलें.

तुळजोजी यांच्या स्त्रिया दोघी जणी. [त्यांनीं] चनपटणास फिर्याद करून, बहादर यांजकडे थैल्या वगैरे पाठवून, त्या मुलांस व त्या बायांस चंदावरांत ...प म्हणोन इंग्रजांचा बंगला होता तेथें जाऊन रहावें म्हणून सांगून पाठवून, विलाइताहून पत्रें आणवून, तिकडील हुकुमावर पंचविसावे वर्षांचे सरफूजीस गादीवर बसविलें. अमरसिंग यास महिना दोन हजार होन ... करार करून मध्यानूर चंदावर पासून दहा कोसावर आहे तेथें ... सरफूजींस बसविलें. अमरसिंग यास पुत्र [ झाला ] त्याचें नांव ...पराव भोंसले. [ हे ] हल्लीं आहेत. अमरसिंग मृत्यु पावले.

हल्लीं* राज्यकर्ते सरफूजी राजे तुळ... दत्तक पुत्र. सरफूजी यांस ...त शिवाजी म्हणोन पुत्र सोळा वर्षांचा आहे. कन्या पांच आहेत. जांवई मोहिते आहेत. इंगळे जांवई आहेत. सुरवे जांवई आहेत. सर्फोजी वय सुमारें ४९ वर्षें आहे. गादीवर काल्युक्तनाम संवत्सरीं बसविलें. ...व्हां] त्यांचें वय २५ वर्षांचें होतें. हल्लीं गादीवर बसून २४ वर्षें अजमासें ...लीं......कलम.

वंशावळ करवीरकर यांचीः—

१ शिवराव मूळ पुरुष. पुत्र एक लढाईत मेले. दोन असामी बाकी.
२ भीमसिंग पुत्र एक.
३ विजयभान पुत्र एक.
४ खेलकर्ण पुत्र एक.
५ जयकर्ण राजा पुत्र एक.
६ महाकर्ण राजा.
७ राजा शिव पुत्र एक.
८ बाबाजी भोंसले यांस पुत्र दोन.
९ मालोजी वडील व धाकटे विठोजीराजे. यांस पुत्र आठ असामी पाटिलकी करून आहेत. त्यांचा वंश इकडे नाहीं. पुणें प्रांतीं आहे.
१० शहाजी राजे.
११ शिवाजी राजे शककर्ते शके १५९६.

---

* हल्लीं म्हणजे सुरू सन १२२७ म्हणजे इ० स० १८३६ चे सुमारास.

१२ राजाराम साहेब.

१३ संभाजी राजे.

१४ शिवछत्रपति.

१५ शाहा छत्रपति सिंहासनारूढ आहेत. राज्यकर्ते.

१६ संभाजी महाराज.

येणेंप्रमाणें मूळ पुरुषापासून सन समान सल्लासीन मयातैन व अ (१२३८)* छ. ७ रबिलाखरपर्यंत.

सातारकर राजे यांची वंशावळ. पहिले अकरा पुरुष वरील कलम पुढें येणेंप्रमाणें:—

१२ संभाजी राजे.

१३ शाहूराजे

१४ राजाराम साहेब.

१५ शाहूराजे.

१६ प्रतापसिंह राजे हल्लीं सिंहासनारूढ आहेत. नांव बुवा साहेब.

येणेंप्रमाणें मूळ पुरुषापासून सन समान सल्लासीन मयातैन व अल्ल (१२३८) छ. ७ रबिलाखरपर्यंत राजे झालेले आहेत.

चंदीचंदावरकर राजे यांची वंशावळ. पहिले दहा पुरुष शहाजीपर्यंत प्रमाणें. पुढचे येणेंप्रमाणें:—

११ व्यंकोजी राजे.

१२ तुकोजी राजे.

१३ बावा साहेब.

१४ प्रतापसिंग राजे.

१५ तुळजाजी राजे.

१६ सरफोजी राजे सिंहासनारूढ आहेत.

येणेंप्रमाणें मूळ पुरुषापासून सन समान सल्लासीन मयातैन व अल्लफ (१२३८) पावेतों राजे झाले.

शके १७५९ हेमलंबीनामसंवत्सरे छ. १२ रबिलाखर रोज इंदुवार.

यादी, सन १८२९ इसवी. श्रीमन्महाराज राजे प्रतापसिंह महाराज छत्रपति इलाखा सातारा हे मराठयांत उत्तम ज्ञाती क्षत्रिय असें म्हणवितात. यांचें मूळ असें आहे कीं, हे पाटील मौजे देऊळगांव परगणे पाटस प्रांत पुणें. व पुढें वेरूळ येथील यांचे मूळ पुरुष बाबाजी राजे. उपनांव भोंसले. यांस

* म्ह० इ० स० १८३७.

वडील मालोजी यांची स्त्री दीपाबाई व धाकटे विठोजी राजे या पुत्र. पैकीं विठोजी राजे यांस पुत्र ८ झाले. त्यांचा वंश आहे. वडील पुत्र शहाजी यांचा जन्म इ० स० १५९४ सालीं पुत्र सरीफजी. त्यांचा वंश या राज्याचा अधिकारी नाहीं. शहाजीची जाधव निसबत दौलताबादकर पादशहा यांची कन्या. तिचें नांव शहाजीस जिजाबाईचे पोटीं वडील पुत्र संभाजी राजे झाले. श- लताबादचे पादशहाची सरदारी केली. तेथें न बने. सबब पुढें र पादशहाची चाकरी कबूल केली. शहाजीस जिजाबाईचे पोटीं शिवाजी राजे शिवनेर किल्ल्यावर जहाले. त्यांचा जन्म इ० स० सालीं झाला. शहाजीनें दुसरी स्त्री केली बाजी मोहिते यांची ब- जला पुत्र वेंकोजी राजे झाले. शहाजीनें चंदावरचें राज्य विजा- दशहाचे चाकरींत परशत्रूपासून घेतलें. ती जहागीर विजापूरकरांनीं दिली. शहाजीचे वडील पुत्र संभाजी होते ते कर्नाटकांत लढा- शिवाजीचें लग्न विजापुरांत नेऊन शहाजीनें केलें. शिर्के यां- कोणी निंबाळकरांची कन्या म्हणतात. तिचें नांव सईबाई. पुढें [यांनीं] पुणें प्रांतीं राहून पुंडाई करून राज्य मिळविलें. पुढें शिवाजीनें तीन लग्नें केलीं:—

सोयराबाई शिरके यांची कन्या.

सईबाई शिरके यांची कन्या. कोणी निंबाळकरांची म्हणतात.

पुतळाबाई मोहिते यांची कन्या.

वाजीस सईबाईचे पोटीं संभाजी राजे जन्मले. दुसरी स्त्री सोयराबाई टीं राजाराम जन्मले. शहाजी कर्नाटकांत इ० स० १६६१ सालीं चंदावरचें राज्य व्यंकोजी राजे करूं लागले. त्यांचा वंश तिकडे अ- हे. शिवाजी दिल्लीस गेले होते. तेथें अवरंगजेब बादशहाचे कैदेंत संभाजी पुत्र समागमें होते. तेथून पळून निघाले ते रायगडास आ- पिलाजी शिरके यांची कन्या संभाजीस केली. तिचें नांव येसूबाई. वाजी राजे यांनीं राज्याभिषेक रायगडास करून घेतला. इ० स० सालीं. पुढें . च सालीं शिवाजीची मातुश्री जिजाबाई पांचोड येथें पुढें प्रतापराव गुजर यांची कन्या राजारामास केली. शिवाजी राजे वर वारले. इ० स० १६८०. शिवाजीची स्त्री पुतळाबाई सती गेली. स्त्रिया पूर्वीच गेल्या होत्या. पाठीमागें सोयराबाई मात्र राहिली. राजी राजे अधिकारी राज्यास झाले. त्यांनीं राजारामाची मातुश्री

सोयराबाई इजला भिंतींत चिणून मारिली. संभाजी राजे यांसि येसूबा
पुत्र शिवाजी राजे जहाले. त्यांचा जन्म इ० स० १६८० त झाला.
राजे यांस अवरंगजेबानें फौज पाठवून संगमेश्वराहून तुळापुरास नेऊ
इ० स० १६८८ सालीं. पुढें राजाराम चंदावरास गेले. त्यांची प
प्रतापराव यांची कन्या वारली. त्यानंतर रंगोजी मोहिते यांची बही
बाई केली व कागलकर घाटगे यांची कन्या राजसबाई या प्रमाणें
केलीं. येसूबाई व तिचा पुत्र शिवाजी या उभयतांस रायगडाहून
बानें फौजा पाठवून धरून लष्करांत नेलें. शिवाजी नांव होतें तें प
शाहू असें ठेविलें. ते आठ वर्षे पादशाई लष्करांत होते. समागमें फि
ताराबाईस पुत्र शिवाजी नामें राजापुरांत इ० स० १६९१ सालीं इ
राजसबाईस पुत्र चंदावर मुकामीं संभाजी नामें झाला. एकूण राजार
पुत्र दोन झाले. नंतर राजाराम चंदावराहून महाराष्ट्रदेशीं पुन: आ
सिंहगड येथें इ० स० १६९९ सालीं वारले. ताराबाईचे पुत्र शिवा
त्यांची स्त्री भवानीबाई इजला कन्या दोन होत्या. पैकीं वडील कन्या
निंबाळकर यांस दिली. धाकटी जाधवराव यांस दिली. शिवाजीस
पन्हाळ्यास बसवून ताराबाई राज्य करीत होती.

शाहूराजे यांचीं लग्नें दोन पादशाही लष्करांत झालीं. १ रुस्तुमराव जाध
कन्या अंबिकाबाई २ शिंदे यांची कन्या सावित्रीबाई. हें लग्न झालें तेव्हां शि
विराबाई कुणबीण आंदण दिली. तिला पुढें शाहू महाराज यांनीं राख केली.
पैकीं अंबिकाबाई वारली. अवरंगजेब पादशहा नगरास इ० स० १७०७
त्यांचे पुत्र [ यांनीं ] दिल्लीकडे जाते समयीं शाहूराजे यांस सोडून देऊन द
रवानगी केली. ते समयीं शिवाजी व ताराबाई यांचे सरदार धनाजी जाधवर
शाहूराजे सातान्यास स० १७०८ इसवी सालीं आले आणि नेहमीं रहा
छावणी केली. पन्हाळ्यास शिवाजी राजे व त्यांची मातुश्री ताराबाई
करीत होती. शिवाजीची स्त्री भवानीबाई गरोदर असतां शिवाजी स० १
सालीं वारले. त्यांजला पुत्र भवानी बाईचे पोटीं रामराजे स० १
इसवीचे सालीं झाले. त्यांजला राजसबाईचे भयास्तव मूल झालें म्हणोन
न गुप्तरूपें बारशी महालांत ताराबाईनें ठेविलें. शिवाजी वारल्या नंतर
जी राजे यांस पन्हाळ्याचे तक्तावर बसवून राजसबाई राज्य करूं
आणि ताराबाईस नजरबंद ठेविली. पुढें शाहूराजे व संभाजी राजे
लढाया झाल्या. ते समयीं संभाजीचीं मुलें माणसें शाहूराजे यांनीं ओल
सातान्यास आणिलीं. त्यांत ताराबाई देखील आणिली. पुढें संभाजी

रणेच्या सरहद्दीचा तह जहाला. संभाजीचीं मुलें माणसें पन्हाळ्यास गीं. त्यासमयीं ताराबाई करवीरास गेली नाहीं. सातान्यासच राजा- इली. शाहूराजे करवीरांत तह झाला ते समयीं गेले होते. शाहूरा- स्त्री सावित्रीबाई राहिली होती ती वारली. नंतर शाहूराजे यांनीं पुनः केलीं. १ कुवरजी शिरके यांची कन्या सकवारबाई; २ मोहिते ा सगुणाबाई. शाहूराजे यांस पुत्र झाला तो एक वर्षानें वारला. ाख हिचे पोटीं राजसबाई कन्या झाली. ती जातीकडून शुद्ध कर- कदम बेटकोपरलेकर यांस दिली. सगुणाबाई जेजुरीस दुखण्या- ी. तेथेंच वारली.

रास संभाजी होते. त्यांचे स्त्रीचें नांव जिजाबाई. वारणे पलीकडे लागले. त्यांचा वंश तिकडेच राहिला. इकडे शाहूराजे राज्य करूं यांजकडील बाळाजी विश्वनाथ पेशवे प्रधान वगैरे यांनीं हिंदुस्थानां- होळकर यांचे हातें राज्य घेतलें व दाभाडे सेनापति यांनीं पिलाजी यांचे हातें गुजराथ प्रांतींचें राज्य घेतलें. रघूजी भोंसले यांनीं डवण प्रांतीं जाऊन राज्य घेतलें. शाहूराजे बहुत करून कोठें गेले नंतर इ० स० १७४९ सालीं वारले. सकवारबाई सती गेली. बाजीराव प्रधान यांनीं सर्व बंदोबस्त केला.

ताराबाईचे विचारें शिवाजीचे पुत्र रामराजे बारशी पानगांव महा- ठेविले होते त्यांस आणून दत्तविधान केलें. रामराजे यांचीं दोन १ थोरली दुर्गाबाई शिरके यांची कन्या. २ [धाकटी] सगुणाबाई इसाहेब म्हणतात ती बुरुणजी मोहिते यांची कन्या. याप्रमाणें दोन ीं. सर्व बंदोबस्त बाळाजी बाजीराव ऊर्फ नाना साहेब पेशवे यांनीं जे नांवाचे अधिकारी असे केले.

संभाजी राजे करवीरास होते ते इ० स० १७६१ सालीं वारले. ताराबाई स होती ती इ. स. १७६१ सालीं वारली. रामराजे यांस कन्या तीन. त्यांचीं ६२ इसवी सालीं केलीं. १ राघोजीराव बिन कानोजीराव मोहिते कुंभारकर ळाबाई दिली. २ दुर्गोजी महाडीक तारळेकर यांस संतुबाई दिली. घाडगे यांजकडे केली. लग्न झालें नाहीं. मागणी घातली होती. याप्रमाणें पुढें रामराजे यांचा वृद्धापकाळ झाला. पुत्र नाहीं. सबब मूळ पु- ळोजीचे धाकटे भाऊ विठोजी यांस पुत्र आठ. त्यांचे वंशापैकीं मौजे रगणें संगमनेर येथें त्रिंबकजी राजे भोंसले शिलेदारीचा रोजगार होते. त्यांस पुत्र तीन होते. १ वडील रामराजे. २ [दुसरे] शिंग राजे. ३

तिसरे परशुराम राजे. त्यांपैकीं वडील रामराजे यांस माधवराव ना
धान यांचे कारकीर्दींत बाळाजी जनार्दन फडणीस यांचे सल्ल्यानें
१७७७ सालीं दत्तक घेतलें. नांव धाकटे शाहूराजे असें ठेविलें.

पुढें सन १७७८ इसवी सालीं रामराजे वारले सगुणाबाई ऊ
साहेब ही होती. ते समयीं धाकटे शाहूराजे यांचें वय आठ वर्ष
त्यांस राज्याभिषेक सन १७७९ सालीं केला. रामराजे यांचीं तीन ल
[पहिली] नारायणजी मोहिते माजगांवकर यांची कन्या. इजला कन्या दे
होत्या. त्यांपैकीं महादजीनाईक निंबाळकर दहीगांवकर यांस दिली ई
नांव साहेबजी होतें. दिनकरराव बिन येलोजी मोहिते गोंवेंकर न.
यांस दिली होती तिचें नांव गोजराबाई. सदर्हू दोघी कन्यांचीं लग्नें इ
१७९१ सालीं झालीं. नंतर ती राणी ही वारली व दोन्ही कन्या ही
त्यांचे भ्रतार ही वारले. त्या दोघीं पैकीं वंश कोणाचाही राहिला नाहीं
राजे यांची पहिली स्त्री वारल्यावर दुसरी नरसिंगराव गुजर वस्ती
प्रांत खटाव यांची बहीण केली तीही लवकरच मेली. दुसरी ऊ
सतां भवानजी राजे शिर्के वस्ती मौजे-शेरवण तालुके अंजनवेल प्रांत
यांची कन्या केली. इचें नांव.........ऊर्फ माई साहेब. शिरक्यां
माई साहेब इच्या उदरीं पुत्र तीन झाले. १ [ पहिले ] प्रतापसिंह ऊर्फ
राजे सन इसवी १७९२ सालीं जन्मले. २ दुसरे रामचंद्र राजे ऊ
साहेब. ३ तिसरे शहाजी राजे ऊर्फ आपा साहेब.

पुढें सन १७९८ इसवी सालीं बाजीराव रघुनाथ प्रधान यांजकडू
न्याचे किल्ल्याचे संस्थानाचे बंदोबस्तास कारभारी येत गेले. त्यांचे
शाहूमहाराज यांचें न बने. सबब बाबूराव कृष्ण आपटे किल्ल्या
त्यांस महाराजांनीं कैद केलें आणि चतुरसिंग यांस सरदार करून सा
बंदोबस्त महाराजांनीं केला. त्यासमयीं बाजीराव यांनीं माधवराव अ
यांस तीन हजार फौजेनिशीं बंदोबस्तास पाठविलें. परंतु किल्ला हर
होय. सबब परशुराम रामचंद्र पटवर्धन यांसि मागाहून पाठविलें.
त्यांनीं फौज मिरजेकडून बोलावून सातारा शहर लुटलें आणि कि
गत करून पूर्ववत् महाराज यांचा बंदोबस्त केला ते समयीं चतुरसिंग
गेले. पुढें इ० स० १८०८ सालीं धाकटे शाहू राजे वारले. माइ
आईसाहेब दोघी सासूसुना जिवंत होत्या. ते समयीं प्रतापसिंह महार
राज्याभिषेक केला आणि त्रिवर्ग महाराज यांचीं लग्नें झालीं. प्रतापसिं
राज यांस विठ्ठलराव मोहिते किंजळकर यांची कन्या केली. नांव अं

१८०८ सालीं लग्न झालें. रामचंद्रराजे ऊर्फ भाऊसाहेब
ी शिर्के यांची कन्या केली. ती एक वर्षांत वारली. सबब दुसरें
नी राजे महाडीक तारळेकर यांची कन्या केली. नांव दुर्गाबाई.
१८०९ सालीं हें लग्न झालें. शहाजी राजे ऊर्फ आपासाहेब यांचें
इसवी १८२१ सालीं जहालें. रावजी महाडीक तारळेकर यांची
ी] नांव..............ऊर्फ जीजीसाहेब. याप्रमाणें तिघांचीं लग्नें झालीं.
न १८१२ इसवी सालीं आईसाहेब वारली. करवीराकडे संभाजी
करीत होते ते वारल्यावर त्यांचे दत्तक पुत्र शिवाजी राजे राज्य क-
ते सन १८१३ इसवी सालीं वारले. त्यांजला पुत्र दोन. वडील
ऊर्फ आबासाहेब हे राज्य करीत असतां संताजी बाजी मोहिते शिले-
ं सन १८२१ इसवी सालीं [त्यांस] मारिलें. पुढें धाकटे पुत्र शहाजी राजे
ासाहेब हे हल्लीं करवीरास तक्तावर आहेत. साताऱ्यास महाराजांचे
े खर्चीस प्रधान पंत सालीना लाख दोन लाख रुपये पुण्याहून पा-
ते. इतक्यांत सन १८१७ इसवीचे सालीं कंपणी सरकारचा व बाजी-
े यांचा बिघाड झाला. त्या समयीं त्रिवर्ग राणी साहेब यांस वासो-
केल्लयावर साताऱ्याहून नेऊन ठेविलें आणि त्रिवर्ग महाराज व माई-
ास बाजीराव यांनीं स्वारी समागमें घेतलें. ते समयीं कंपणी सरकार-
हाराजांचा तह ठरून अष्टें नजीक पंढरपूर एथील मुक्कामाहून महा-
णी सरकारच्या लष्करांत आले. तेथून साताऱ्यास जाऊन स्वस्थतेनें
सें झालें. पुढें बाजीराव ब्रह्मावर्तास रहावयास गेले. सर्व राज्यांत
रकारचा अमल जाला. त्या समयीं महाराजांस सह्याद्रीचे पर्वेस व
नदीचे उत्तरेस मुलूख; खेरीज दक्षिणेस [नीरा] व पश्चिमेस भीमा या सर-
मुलूख; शिवाय जहागीरदार १ सचीव, २ फलटणकर निंबाळकर,
ाव डफळे, ४ पंत प्रतिनिधि, ५ अक्कलकोटकर भोंसले, एकूण
हागीरदार यांच्या मुलखासुद्धां मुलूख कंपणी सरकारांतून सुपूर्द केला.
यांची सरहद्द. ह्या सरहद्दी बाहेर अक्कलकोटकर यांचा मुलूख भीमे-
र्वेस आहे. निरेची सदहद्द लिहिली. परंतु सचीव यांचा
निरेच्या उत्तरेकडे ही आहे. याप्रमाणें मुलूख स्वाधीन झाला.
ाप चालत आहे. प्रतापसिंह महाराजांची पहिली स्त्री वारली म्हणून
ाकटी बहीण दुसरी केली. नांव अंबिकाबाई ठेविलें. पुढें भाऊ-
जत मुक्कामीं सन १८२० इसवीचे सालीं वारले. पुढें दुसरे सालीं
ब धुळखेड मुक्कामीं सन १८२२ इसवी सालीं जानेवारींत वारली

प्रतापसिंह महाराजांस कन्या गोजराबाई दुसरे स्त्रीस झाली. पांच व
नंतर तिसरें लग्न प्रतापसिंह महाराजांनीं सन १८२८ इसवीचे स
आपा शिरके नागपूरकर यांची कन्या केली.

राज्य केलें त्याची कारकीर्द वर्षें:—

४१ शिवाजी राजे यांनीं.
  ३५ पुंडावे केले.
  ६ राज्याभिषेक केल्यावर होते.
  ——
  ४१.
८ संभाजी राजे.
११ राजाराम साहेब.
८ शिवाजी बिन राजाराम साहेब यांची शाहूराजेपर्यंत कारकी करवीराकडे लागले. तीं वर्षें वेगळींच आहेत.
४२ शाहूराजे थोरले.
१९ रामराजे दत्तक शाहूराजास दिले.
३० धाकटे शाहूराजे. रामराजास दत्तक दिले.
२१ प्रतापसिंह महाराज.
  ९ पेशवे यांचे कारकीर्दींत त्यांचे बंदोबस्तानें.
  १२ हल्लीं सालमजकूर ( इ० स० १८२९ ) पर्यंत कं कारंचे दोस्तींत स्वसत्तेसह कायम राज्य करीत आहे
  ——
  २१.
——
१९०.

पैकीं पुंडावे बद्दल वजा वर्षें ३५. बाकी १५५ वर्षें शिवाजीचा शक चालत आहे.

## परिशिष्ट दुसरें

## वंशावळी.

### सातारकर राजे.

शिवाजी महाराज शककर्ते मूळ पुरुष.






चंदावरकर राजे यांचे वंशावळीचें झाड लिहिलें आहे कृष्णराव गर्दे यानीं. तारीख २२ माहे जिलकाद सन सबां अशरीन मया तैन व ( १२२७ ). मुा दरजागा ( ! ) करवीर. जबानी भवानराव घाटगे राव यांचे सांगणेवरून.

ारिशिष्ट ३.—ग्रंथप्रकाशकांनीं तयार केलेली वंशावळ.

## सातारचे राजे भोंसले यांची वंशावळ.






१ मालोजीची स्त्री दीपाबाई म्हणून होती. ती वंगोजी ऊर्फ जगपा निंबाळकर यांची बहीण होती.

२ शहाजीची पहिली बायको जिजाबाई ही लुखजी जाधवराव कन्या होती. हिचें जन्म. इ० स० १५९३ त झालें व विवाह इ. स. १ त झाला. ही इ० स० १६७४ त मृत्यु पावली. हिला संभाजी व शि हे दोन पुत्र होते. शहाजीची दुसरी बायको तुकाबाई ही मोहित्यांची होती. हिचा विवाह इ० स० १६३९ त झाला. हिला व्यंकोजी म्हणून

चंदीचंदावरचा राजा झाला. शहाजीची एक नाटकशाळा होती ति-
ो म्हणून पुत्र झाला.

ावाजीची पहिली बायको सईबाई ही निंबाळकरांची कन्या. हिचा
स० १६३७ त झाला व ही इ० स० १६५९ त वारली. हिचा
यांचें जन्म स० स० १६५७ त झालें. शिवाजीची दुसरी बा-
शिरक्यांची कन्या. हिचा पुत्र राजाराम. हिचा संभाजीनें
शिवाजीची तिसरी बायको पुतळाबाई ही शि-
८० त सती गेली. शिवाजीच्या ४ थ्या बायको-

पुताई ही शिरक्यांची कन्या. हिचा पुत्र शाहू
.० १६८० त जन्मला. संभाजीची एक नाटकशाळा होती तिच्या
ांव मदनसिंग होतें.

ाजाराम यास चार बायका होत्या. १ जानकीबाई, २ ताराबाई, ३
ई व ४ अंबिकाबाई. ताराबाईचें जन्म इ० स० १६७५ त झालें होतें व
स० १७६१ त वारली. तिचा पुत्र शिवाजी हा वेडा होता. ह्याचें जन्म
१६९० त झालें होतें व हा इ० स० १७२० त मृत्यु पावला. ह्याच्या
नांव भवानीबाई होतें. हिच्या पुत्राचें नांव रामराजा असें होतें. हिला
व कृष्णाबाई अशा दोन कन्या होत्या. ह्या रामराजाचा जन्म इ०
७२० त झाला होता. राजारामाची तिसरी बायको राजसबाई हिला
म्हणून एक पुत्र होता. तो कोल्हापूरचा राजा झाला. राजारामाची
बायको अंबिकाबाई हिला एक कन्या होती. खेरीज सगुणाबाई म्हणून
ाची नाटकशाळा होती तिला एक कर्ण म्हणून पुत्र होता.

शाहूला सावित्री, अंबिका ... गुणा, व गजरा अशा पांच
होत्या. शाहू इ० ... ा तेव्हां सकवारबाई सती
बाकीच्या बायका ... शाहूला एक पुत्र झाला
लहानपणींच मृत ... वी स्त्री ताराबाई इचा पुत्र वेडा
याचा मुलगा रामर... चा दत्तक पुत्र झाला.
रामराजा याला दोन ... झाल्या. त्याला शाहू या नांवाचा
त्तक देण्यांत आला.

ह्या शाहूला प्रत... द्र ऊर्फ भाऊसाहेब, व शहाजी ऊर्फ ...
ेब असे तीन पुत्र होते.